# सांगीवांगी

संपादिका

डॉ. सरोजिनी बाबर



# महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती

**अध्यक्ष**

डॉ. सरोजिनी बाबर

**सभासद**

श्री. सोपानदेव चौधरी

प्रा. वामनराव चोरघडे

सौ. कुमुदिनी पवार

श्री. स. आ. सप्रे

श्री. शंकरराव खरात

श्री. ना. धों महानोर

श्री. त्र्यं. गो. देशमुख

श्री. जयंतराव पाटील

श्री. यू. म. पठाण

प्रा. सुमन पाटील

श्री. नामदेवराव व्हटकर

श्री. शंकर खंडू पाटील

डॉ. सौ. सविता जाजोदिया

**चिटणीस**

श्री. एम. जी. मराठे

शिक्षण उपसंचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

## प्रास्ताविक (आवृत्ति दुसरी)

आपल्या मनातली गोष्ट दुसऱ्याला सांगावी अगर दुसऱ्याच्या ओठांवर खेळलेली गोष्ट आपण ऐकावी अशा स्वभावधर्माचा माणूस हा गोष्टीवेल्हाळ असतो. त्याला आपल्या जिवाची करमणूक करून घ्यायला अगर मानसिक विश्रांति मिळवायला या स्वभावधर्माचा फार उपयोग होतो. तर आजकालच्या जगात अशीच माणसं फार. त्यामुळं लोकसाहित्य समितीच्यावतीनं प्रकाशित झालेलं **सांगीवांगी** हे लोककथांचं पुस्तक बघता बघता केव्हाच संपलं. मिळेनासं झालं. लहानांपासून मोठ्यांपर्यंत सर्वांनीच त्याएकी अगत्य दाखवलं. पुन्हा कधी ते मिळेल म्हणून अगत्यानं विचारपूस केली. आम्हाला हे हवंय म्हणून गळ घातली. त्यामुळंच आज 'सांगीवांगी' ची दुसरी आवृत्ति प्रकाशित होत आहे. आमचे असंख्य वाचक या पुस्तकाचं सहर्ष स्वागत करतील याची खात्री आहे.

माय मराठीचं राऊळ या कथांनी पुन्हा एकवार दुमदुमून जावो आणि ही साठा उत्तरांची सुफळ कहाणी सर्वांच्या मुखी रुळो एवढीच अपेक्षा.

वसंत पंचमी
पुणे, १९८२

## अनुक्रम—



आली रात्र सरत नाही न् सांगती गोष्ट संपत नाही अशा खानदानीत वाढलेला आमचा पिंड गावाकडचं निर्मळ अंगण नजरेला दिसलं की. स्वत:ला पण विसरावं म्हणतो. तेजाळ रत्नागत अशा वेळी आमची नजर चमकते आणि गोष्टी ऐकून ऐकून तृप्ती न झालेले कान कसे टवकारावे म्हणतात. त्यातून परवंटच्या साडीतली लाडकी मैना भुईला लोळतेला पदर सावरीत नाहीतर डोईवरच्या पटक्याचा शेमला लोढण्यागत लोळवीत एखादा राजसबाळ घराचं जोतं चढून वर येतेला दिसावा म्हणजे हरखून टुम्म व्हायला होतं. ह्या चिमण्या पोरांनी ओसरीवरच्या खामनीवर ठेवलेल्या दिव्याला हात जोडीत—

*दिव्या दिव्या दीपत्कार*
*कानी कुंडल मोतीहार...*

असं म्हणायचा अवकाश की, हा दिवादेखील समाधानानं लुकलुकत लामणदिव्याच्या रुबाबानं बोलावं म्हणतो—

*जाईन आपुल्या मंदिरा*
*येईन उद्याच्या सांजेला*
*आवडत्या राणीला*
*नावडत्या राणीला*
*फार फार विचारलंय सांगायला*

त्यामुळं ह्या घराची काया कशी मोहरून उठते. दिवसभराच्या कामानं आळसावलेलं घर हुशारीत येईन म्हणतं आणि मग तिथली

सारी दुनिया झोपाळायची सोडून रायाइंद्राची भाषा करावी म्हणते. अशा वेळी घरात पेटलेली चूलदेखील पुटपुटते कशी---

*झंभराचं झिजवीन*
*लक्षांना पुरवीन*
*हांडाभर उरवीन*
*मुली ग मुली*

त्या कारणानं बारक्या पोरीवाळींचं काम मागं सरतं आणि एखादी म्हातारी आजी नाहीतर मावशी पोरांना दूधभात कालवून देत त्यांचा लाड करीन म्हणाली की, ह्यांना दाबून फावलंच म्हणा. सगळी पोरं एकमेकांना हाकारा घालीत घर डोक्यावर घ्यावं म्हणतील न् जेवता जेवताच गोष्टींचं पेव फुटेलसुद्धा!

*कुंभारा कुंभारा*
*दे दे मडकुल्ला*
*जाऊ जाऊ गंगुल्ला*
*घेऊ घेऊ पाणुल्ला*
*धुऊ धुऊ चुचुल्ला*
*जाऊ जाऊ वऱ्हाडा*
*खाऊ खाऊ मांडुल्ला*
*गुडगुंच्या गो गुडगुंच्यो*

असल्या भाषेला मग जोर चढेल आणि वडीलधाऱ्यांचं पण काळीज खुलून जाईल. उसळच्या घेतेल्या पोरांच्या कवतिकाला उधाण आलं पाहिजे असा त्यांनी यावेळी मग निर्णय घेतलाच म्हणा. त्यामुळं एखाद्या चिमुरडीनं आजीच्या नाहीतर मावशीच्या खांद्यावर लोळण घेत, "एकदा काय झालं की, एक म्हातारी मुसळ घेऊन गहू कांडत होती हं! तर उखळातून गहू वर उसळायचे. म्हणून ते वरच्या वर झेलावेत या बेतानं आभाळ लागलं त्या म्हातारीच्या पायात घुटमळायला. तशी मुसळाचा दणका बसला आभाळाला.

म्हणताना आभाळ एवढं भ्यालं, अस्सं घाबरलं की, त्या दिवसापासून जे वर पळालं ते पुन्हा म्हणून खाली आलंच नाही ! . . . झाली गोष्ट." अशी काळजाची पकड घेतली म्हणजे तिथं इंद्रसभा, चंद्रसभा बसलीच म्हणून समजावं. हिऱ्यामोरावरचा हरी न् इंद्र-सभेची पद्मिनी मग तिथं आलीच म्हणावं ! . . . जेवण रहातं मग तिथल्या तिथंच आणि सतरांदा लोणच्याची चव घेत जिवाचा आनंद लुटावा त्या धर्तीनं कुणी तरी गोष्ट सांगायला पुढं येतं. अशा वेळी पाच सात वर्षांचा बाळराजस वाघ मागं लागल्यागत घाईगर्दीनं न् धापा टाकीत आपल्या ठेवणीतली गोष्ट सांगायला मधेच सुरुवात पण करतो--

"एक होती चिमणी न् एक होता कावळा. दोघे जंगलात गेले. तर चिमणीला सापडले मोती. कावळ्याला सापडला हरभरा. त्यानं तो खाल्ला. चिमणीकडे गेला. म्हणाला, 'चिम्मीबाई, चिम्मी-बाई, बघू तुझे मोती ?' चिमणी म्हणाली, 'नक्को नक्को. चोरून-बिरून नेलेस तर काय करू ?' पण हा म्हणाला, 'छे ग ! नाही चोरणार. बघून तुला लग्गेच परत देतो.' तेव्हा चिमणीने त्याला मोती दिले न् मग तो गेला की लगेच उंच उडून न् बसला एका झाडावर येऊन! तशी चिमणी मोठ्याने ओरडली, 'माझे मोती दे.' तर तो म्हणतो कसा, 'नाही देत जा!' मग चिमणी गेली झाडाकडे. म्हणाली, 'झाडा, झाडा, कावळ्याला पाड रे तुझ्या अंगावरून !' झाड म्हणाले, 'मी नाही पाडीत जा.' तेव्हा चिमणी गेली सुताराकडे. म्हणाली, 'सुतारा, सुतारा, झाडाला तोडून टाक रे.' सुतार म्हणाला, 'मी नाही तोडीत जा.' चिमणी मग गेली राजाकडे. म्हणाली, 'राजा, राजा, सुताराला दंड कर रे.' राजा म्हणाला, 'मी नाही जा दंड करणार.' तेव्हा चिमणी गेली राणीकडे. म्हणाली, 'राणी, राणी, राजावर रूस गो.' राणी म्हणाली, 'अंऽहं ! मी नाही रुसायची.' मग चिमणी गेली उंदराकडे. म्हणाली, 'उंदरा, उंदरा, राणीचे लुगडे फाड रे.' उंदीर म्हणाला, 'नाही रे बाबा.

मी नाही फाडणार.' तेव्हा चिमणी गेली मांजराकडे. म्हणाली, 'मांजरा, मांजरा, उंदराला खाऊन टाक रे.' मांजर म्हणाले, 'मुळीच नाही.' मग चिमणी गेली कुत्र्याकडे. म्हणाली, 'कुत्र्या, कुत्र्या, मांजराला चाव रे.' कुत्रा म्हणाला, 'मी नाही जा.' चिमणीला राग आला. मग ती गेली सोटयाकडे. म्हणाली, 'सोटया, सोटया, कुत्र्याला ठोकमार दे रे.' सोटा म्हणाला, 'मी नाही जा.' तेव्हा चिमणी गेली अग्नीकडे. म्हणाली, 'अग्नी, अग्नी, सोटयाला जाळून टाक रे.' अग्नी म्हणाला, 'छे! मी नाही ऐकणार तुझं.' मग चिमणी गेली समुद्राकडे. म्हणाली, 'समुद्रा, समुद्रा, अग्नीला विझवून टाक रे.' समुद्र म्हणाला, 'मी नाही जा.' तेव्हा चिमणी खूप खूप रागावली. गेली हत्तीकडे. म्हणाली, 'हत्ती, हत्ती, समुद्राला ढवळून टाक रे.' हत्तीनं म्हटलं, 'मी नाही ढवळणार जा.' मग चिमणी संतापली. गेली मुंगीकडे न् म्हणाली, 'मुंगे, मुंगे, हत्तीच्या कानात शीर गो.' मुंगी, 'हूं' म्हणाली. त्यासरशी हत्ती म्हणाला, 'नक्को नक्को. मी समुद्र ढवळून देतो.' समुद्र म्हणाला, 'नक्को, नक्को. मी अग्नीला विझवतो.' अग्नी म्हणाला, 'नक्को नक्को. मी सोटयाला जाळतो.' सोटा म्हणाला, 'नक्को नक्को. मी कुत्र्याला ठोकतो.' कुत्रा म्हणाला, 'नक्को नक्को. मी मांजराला चावतो.' मांजर म्हणाले, 'नक्को नक्को. मी उंदराला खातो.' उंदीर म्हणाला, नक्को नक्को. मी राणीचे लुगडे फाडतो.' राणी म्हणाली, 'नक्को नक्को. मी राजावर रुसते.' राजा म्हणाला, 'नक्को नक्को. मी सुताराला दंड करतो.' सुतार म्हणाला, 'नक्को नक्को. मी झाड तोडतो.' झाड म्हणाले, 'नक्को नक्को. मी कावळ्याला पाडतो.' कावळा म्हणाला, 'नक्को नक्को. मी मोती देतो.'

कावळ्यानं मग चिमणीचे मोती चिमणीला दिले. चिमणीला खूप खूप आनंद झाला.

इटुकली मिटुकली गोष्ट सरो. तुमचे आमचे पोट भरो."

त्यामुळं गोष्टींचा उपसा ईर्षेनं होत जातो आणि ही मुलं ओसरीवर येऊन आजोबांच्या भोवती भोवती तरंगत सुटतात. तशी आजोबांना हसू फुटतं न् ते गमतीचा आवाज काढीत बोलून जातात—

*तुझं नाव काय ?*
*तालिम तोला.*
*खातोस काय ?*
*भाज़ीपाला.*
*मुलं बाळं किती ?*
*पंधरा सोळा.*
*बायको कुठं गेली ?*
*म्हायाराला.*
*तुला रे जेवायला ?*
*वाघोबा आला.*

त्या कारणानं आजीला पण सुरसुरी येते न् आपल्या दात पडक्या तोंडात जीभ खेळवीत तालासुरावर तिची गोष्ट रंगत पुढं येते—

*आंबा जो कोवळा*
*त्याचा मोहोर मी पाहिला*
*तो बाई मोहोर पीकला*
*त्या ग मोहोराचं*
*लोणचं मी घातीलं*
*ते बाई लोणचं*
*दिराला मी वाढीलं*
*त्या बाई दिरानं*
*चुडे ग मला दिले*
*ते बाई चुडे मी*
*खेळताना वाढविले*
*त्या बाई सासूनं*
*धपाटे मला घातीले*
*त्या बाई धपाट्यानं*
*आसुवं माझी गळाली*

*ती बाई आसुवं ग*
*तांब्यात मी भरीली*
*तो बाई तांब्या*
*गंगेत मी सोडीला*
*त्या बाई गंगेनं*
*उदक मला ते दिलं*
*ते बाई उदक मी*
*कुडाला पाजीयीलं*
*त्या ग कुडानं बाई*
*काठी मला दिली*
*ती बाई काठी मी*
*बुरडाला आणून दिली*
*त्या बाई बुरडानं ग*
*परडी मला दिलीन्*
*ती बाई परडी मी*
*माळ्याला सये दिली*
*त्या ग माळ्यानं सई*
*फुलं मला दिली*
*ती बाई फुलं मी*
*देवाला अर्पण केली*
*ईश्वर पार्वतीच्या*
*चरणावरी मी वाहिली*

आणि मग कहाणीला खरी रंगत येत जाते. अशा वेळी मध्यान रात्रीचा चंद्र खाली कलायच्या अगोदर या चोख्यामेळ्यात येऊन बसावं म्हणतो न् गोष्टीला कान देतो! आपलं चांदणं पुरतं भोगायच्या अगोदरच तेलातुपाचं दिव्याला भरण घालीत तिथं बसायला तो उतावीळ होतो. एवढ्यात त्याच्या कानांवर पडतं की—

"अगदी म्हणजे अगदी जुन्या काळी समुद्राच्या काठावर भाकरीचं पीठच पीठ होतं. तर ज्याला भूक लागेल त्यानं तिथं

जावं, लागेल तेवढं पीठ घ्यावं न् भाकरी करून खावी. पण लागेल त्यापेक्षा कुणी चिमूटभरही जादा पीठ घ्यायचं नाही हा कायदा. पण एकदा काय झालं की, एका बाईच्या मनात निराळाच विचार आला. म्हणाली की, रोज रोज कुठवर समुद्रावर जायचं? म्हणून गेली न् चांगलं चार सहा दिवस पुरेल एवढं पीठ घेऊन आली. त्याचा परिणाम वाईट झाला. उरलेल्या पिठात चंद्रानं लोळण घेतली न् सगळंच पीठ नाहीसं झालं! त्या जाग्यावर मग उरली ती फक्त वाळू!... तेव्हापासून समुद्राच्या काठी वाळूच वाळू आली." मग बरीक आपल्याला कुणी काही विचारील या धास्तीनं तो तिथून हलकेच पाय काढून घेऊन खायल्या अंगाला कलतो.

तेवढ्यात रत्नाचा दांडा पुजलेल्या, मोत्यांचा भांग भरलेल्या, अर्धचंद्र शीसफूल मिरवतेल्या, अंगी मरव्याची चोळी ल्यालेल्या, माथ्यावर मोत्यांची जाळी घातलेल्या, जाईजुई शेवंतीचे हार ल्यालेल्या, जरतारी साडी नेसलेल्या आणि शिरी बाशिंग बांधलेल्या कृष्णदेवाच्या रुक्मिणीची गोष्ट सांगायची आहे असा पुकार करीत आजोबा हातावर तंबाखू मळून चिलमीत बार भरीत पोरांना हावळा खायला देतात. त्या कारणानं पोरांच्या कानांत कधी काळी कुठं तरी कुणी तरी गाईलेलं झाडामाडांच्या लग्नाचं गीत घुमतं आणि त्यांच्या नजरेसमोर लिंबराणी, फणसकुवरी, सहीडालिंबी, खजुरी जांभुळी, चिंच सुंदरी असल्या मानापानाच्या करवल्या येतात. म्हणताना हावळा मोठ्या चवीनं खाल्ला जातो. आणि जिला कधी मरण नाही, जिचा तजेला कधी कोमेजत नाही न् जिला कधी कुणी विसरत नाही अशा डामडौलाच्या कहाणीला आजोबा आठवणीत घोळतात. भांगतुऱ्याच्या रत्नजडित दागिन्यागत मग—

*आंकणं काकणं*
*सोन्याचं झाकण*
*तान्ह्या बाळाला*
*देवाची राखण*

या अपेक्षेनं नटलेली आजोबा सांगतेली कथाराणी तोंडानं काढून हातानं पेरावी अशी झोकात कानांवर येऊ लागते—

"लईन्दी झालं गा या गोष्टीला. तवाच्या येळंला इंद्रदेव वसलंवतं सभेला. दरवार खच्चून भरलेला. सरदार मानकरी, भालदार चोपदार जमा झालेले. तशी इंद्रदेवाच्या मनात काय आलं कुणाला माहीत. आपल्या साती लेकींला त्यानं दरबारात बोलीवलं. विचारलं कसं, 'तुम्ही कुणाच्या कोण पोरी हो?' तशी 'आम्ही तुमच्या लेकी देवा.' पोरींनी असं उत्तर केलं. मग इंद्रानं पुन्हा विचारलं, 'कुणाच्या जिवावर जगता तुम्ही?' सहा पोरींनी त्यावर उत्तर केलं, 'तुमच्या तुमच्या.' पण सातवी ठसक्यानं बोलली, 'मी माझ्या जिवावर जगते!' त्यासरशी इंद्रदेवाला राग आला. संतापाच्या भरात त्यानं तिला शाप दिला, 'भूलोकी चालती हो.' आणि जादूची कांडी फिरवून चार महिन्यांची पोरगी केली! आता काय करावं? दरबार विचारात पडला. पण इंद्रानं एका सरदाराला हुकूम सोडला, 'घेऊन जा हिला. द्या फेकून जंगलात.' तशी त्या वावानं हिला उचलली. पोटाशी धरली. घरला आला. सोन्यानं मढविलेल्या पेटीत हिला निजवली. पेटी डोक्यावर घेतली. मोठ्या चुंबळीवर अधांतरी ठेवली. निघाला. आला स्वर्ग-लोकातून धरणीवर. गाठलं जंगल. तिथं ही पेटी ठेवली न् त्या पोरीला 'तुजं उदंड होईल.' असा आशीर्वाद देऊन माघारी फिरला.

इकडे तोवर ढोलनाच करतेले धनगर त्या जंगलात आले. दिवसा उजेडी काय गा चकाकतंय म्हणाले न् त्या पेटीजवळ आले. बघतात तर सोन्यानं मढविलेली पेटी. ती बघून देवाची कृपा म्हणाले. नाचगाणं केलं. उभं गाव आलं. आणिक एकानं जिवाचा धडा करून ती पेटी उघडली तर आत तान्हं बाळ मुठी चोखीत निजलेलं! ह्यांना बघून खुदकिनी हसतेलं. तशी तिथं केवढा आनंद उभा राहिला! त्या धनगरानं हे बाळ उचललं. गेला घरला घेऊन. स्वत्ताच्या पोरागत जोपा केली. बिरुबा देवाची रोज पूजा बांधली.

होता होता ह्या पोरीला आकरावं सरून बारावं लागलं. तशी रीतीरिवाजाप्रमाणं त्या धनगरानं हिचं लगीन करायची भाषा केली. तर हिनं त्याला साफ सांगून टाकलं, 'काळजी नको. माझा नवरा मी बघीन.' बिचारा धनगर गप्प बसला.

हिनं मग शंकराची पूजा बांधली. स्वत: तप करीत बसली. एक दिवस मग तिथं एक म्हातारा साधू आला. त्यानं हिला खडाव दिले. हे खडाव पायात घाल म्हणाला. म्हणशील तिथं ते तुला नेतील बोलला न् स्वत: निघून गेला. हिनं मग प्रचीती घ्यावी म्हटलं. खडाव पायात घातले. माझ्या पतिदेवांचेकडे चल म्हणाली. तर काय चमत्कार म्हणावा ? खडाव हिला घेऊन जे उंच उंच उडाले ते थेट जेजुरीला येऊन थांबले.

तिथं मल्हारीदेव न् म्हाळसा रंगमहालात निजलेवते. मल्हारीच्या रूपानं ही भाळली. काजळकडांना बोट घातलं. पदराची धांदोटी फाडली. बोटानं कायसंसं लिहिलं. खुदकन हसली आणि खडावांच्या मदतीनं पुन्हा आपल्या घरी आली. शंकराच्या पूजेला बसली.

इकडे तोवर मल्हारीला जाग आली. त्यानं ती पत्रिका वाचली. त्याचं भान गेलं. हाडबडून उठला. म्हाळसा दचकली. तिनं मग सारीपाटाचा डाव मांडला. मल्हारी खेळायला बसला. पण जाग्यावर चित्त होतंच कुठं? सारखा डाव हारत चालला. ह्यानं डाव हरला तर जंगलात निघून जायचं न् तिनं हरला तर गळक्या घागरीनं रांजण भरायचे अशी पैज लागली. डाव म्हाळसानं जिंकला. मल्हारी राज्य सोडून जंगलात निघून गेला.

वाटेत देऊळ लागलं. तिथल्या देवानं दर्शन दिलं. म्हाताऱ्याचं रूप घेऊन अशा अशा ठिकाणी ह्याला जा म्हणाला. मल्हारी म्हातारा झाला. जख्खड म्हातारा हं! . . . गेला बानूच्या घरी. धनगरांच्या वाड्यावर. ह्याला बघून तिनं हुकूम सोडला, 'मेंढरं वळीत बैस.' हा 'बरं' म्हणाला. गेला मेंढरं घेऊन.

पण होता होता एक दिवस काय झालं की, मल्हारीनं मेंढरांचं कातडं न् मांस बाजूला केलं. त्यासरशी रक्ताचा पाट व्हायला लागला. बानू घाबरून उठली. त्याच्यावर कडाडली, 'हे काय केलंस? भरून दे माझी मेंढरं.' तशी हा शांतपणे म्हणाला, 'देतो देतो. पण माझी बायको झालीस तरच!' त्यासरशी हिचा जळफळाट उडून गेला. दात ओठ खात ती ओरडली, 'मेल्या कुणाशी बोलतोयस तू हे?' तो म्हणाला, 'तुझ्याशी! तुझ्याशी! . . . का?' आणि मग दोघांची ही जुंपली.

शेवटी रडकुंडीला येऊन बानू लग्नाला तयार झाली. मग मल्हारीनं ती मेंढरं जशीच्या तशी साजिवंत केली. दोघांचं लगीन लागलं. लोकरीचे हार एकमेकांनी एकमेकांना घातले. धनगर सुखावला. बानू धुसमुसून रडली. काय पदरात पडलं म्हणून तिनं सारी दुनिया डोक्यावर घेतली.

तेवढयांत मेघ गरजले. वीज कडाडली. आभाळ दणाणलं न् मल्हारी पहिलं रूप घेऊन बानूपुढं उभा राहिला! . . . त्या दर्शनानं बानूचा आनंद गगनात मावेना. राजीखुशीनं आपली थरारती काया तिनं मल्हारीच्या पुढचात झोकली न् घोडचावर स्वार होऊन दोघेजण जेजुरीला निघून गेले" . . . .

त्यावेळी घरात कुणी तरी कवतिकानं गीत गुणगुणतं—

*"काळी चोळी मोती जाळी*
*हार गुंफी गळ्या घाली*
*काळी करटूली कारली*
*वटी मैनाची भरली*
*आमी गौळणी बायका*
*इंद्रावनी गोष्ट सांग*
*दिल्लीच्या नायका*
*झाडावरी मोर काय*
*बोलतो ऐका . . ."*

आणि पाठोपाठ "चांदोबानं चांदणं भोगलं का नाही, झाडाला पालवी फुटली का नाही, पोतीला बिरडं लावलं का नाही, दारातला चाफा फुलला का नाही, उगवती नक्षत्रं दिसली का नाही, अंगणाला रांगोळी आली का नाही, म्हशीला वासरू सोडलं का नाही, गोष्टींचा मेळा उठला का नाही? . . ." असले प्रश्न विचारतेली घरची कर्ती मालकीण एकेकाला धारोष्ण दूध प्यायला बोलावते! त्यामुळं या बैठकीला चढलेला रंग आणखीनच खुलून दिसतो आणि उगवत्या सूर्याच्या साक्षीनं दुधातुपाच्या न्याहारीची पंगत आजीच्याभोवती गोळा होते. . .अशा वेळी 'एक होता राजा'— आणि 'आटपाट नगर होतं'—या भाषेला पुन्हा असा ऊत येतो की, आधणीच्या उकळीगत मनात दाटलेल्या, ध्यानात धरलेल्या, चटका लावून सोडतेल्या गोष्टी नव्या उमेदीनं सरसावून पुढे येतात. त्या नादात कशाचंच भान कुणाला उरत नाही का असं का न् तसं का असली भाषा पण वर्दळीवर येत कुणी कुणाला करीत नाही! अंहं!

—•••—

# ससोबा आणि झिपऱ्या

**निवेदिका : डॉ. सरोजिनी बाबर**

आटपाट नगर. तिथं दाट जंगल. चिक्कार झाडं. भरपेठ पाखरं. हवे तेवढे प्राणी. म्हणाल तेवढं पाणी. लागेल तेवढी फळं. पाहिजे तेवढी गंमत. सांगाल तेवढ्या जमती. कराल तेवढ्या करामती. जुळवाल तेवढे बेत. तर एकदा काय गंमत झाली की, तिथं झिपऱ्या रहायचा हं! म्हणजे पंख असलेला उंदीर हो! . . . हं! तर तो भारी उलाढाली. आणि त्याचा मित्र ससोबा? घटकेत लहान तर घटकेत मोठा असा होणार. झिपऱ्यापेक्षा सवाई करामतीचा. दोघांची



दांडगी दोस्ती. तर एकदा त्यांनी केला बेत. काढली हिकमत. त्यानं झाडाच्या भल्या दांडग्या पोटात एकदम तळाला पोखरलं आणि मग त्यात बांधलं इवलंसं घर. मोठं देखणं, ऐटबाज, सगळ्या सुखसोई तिथं दाबून. म्हणताना झिपऱ्यानं पिटवली दवंडी, "घर भाड्यानं द्यायचं आहे होऽऽ" आणि लगेच भाड्याचे पैसे मोजण्या-साठी म्हणून एक पिशवी घेऊन बसला की बहाद्दर एका मोडक्या झाडाच्या तुटक्या फांदीवर फतकल मारून! तर हो? आणिक ससोबा बसले इकडे घर सजवीत फुलं न् पानं घेऊन. असं नटवलं असं नटवलं त्यांनी आपलं घर की, पहातच रहावं! शप्पथ!... त्या कारणानं सर्व जंगल उठलं ते बघायला. पशुपक्ष्यांची तिकडे जशी रीघं लागली. ससोबा येईल त्याला चहापाणी देत सुटले. तशी भाड्यानं पैसे हवे तेवढे घ्या पण आम्हांला जागा द्या म्हणून सगळे आले की, हमरी तुमरीवर! आता? कुणाला नाही म्हणणार न् कुणाला हो म्हणून तरी सांगणार! झिपऱ्या गेला भुलून. ससोबा दुचीत झाले. मग दोघांनी विचार केला. उद्या बघूया म्हणाले न् दिलं सगळ्यांना पिटाळून. स्वतः दोघेजण मग त्या घरात गेले. तिथल्या मऊ मऊ पिसांच्या पलंगावर निजले. हंड्याझुंबरांच्या लखलखाटानं हारखून गेले.

तेवढ्यात कुणी तरी बातमी आणली की, इथली झाडं कापणार आहेत, तोडणार आहेत म्हणून! आता? म्हणजे सगळंच मुसळ गेलं केरात न् एवढा खटाटोप जायचा की फुकटाफुकटी चुलीत! झिपऱ्या हाडबडून उठला. ससोबा गडबडून गेला. मग दोघांनी विचार केला. झाडाखालच्या पैस मैदानात सगळ्यांची सभा जमवली. खारुताई, चिमणी, कावळा, पोपट, सुतारपक्षी, सरडे, घुशी, उंदीर, वानरं, माकडं, घुबडं, घारी असले कोण कोण सगळे गोळा झाले. त्यांच्यापुढं झिपऱ्यानं सगळं सांगितलं. शेकोटी पेटविली. चहापाणी झालं. मग खारुताईनं एक कंदील आणला न् तो झिपऱ्याच्या हातात देत ती म्हणाली, "हा कंदील हातात धर,

उंच उंच आभाळात उडून जा. दुसरीकडच्या जंगलात आपल्याला घर बघून ये.” सगळ्यांना तिचं म्हणणं पटलं. झिपऱ्याही बरं म्हणाला. सभा उठली. सगळे जागोजाग पांगले. मग ससोबानं झिपऱ्याला जेवू घातलं. फळं खायला दिली. स्वत: घराची राखण करतो म्हणाला न् झिपऱ्याला जा म्हणून त्यानं कंदिलाची वात पेटविली.

झिपऱ्या मोठा वस्ताद. त्यानं बरोबर एक लहानशी काठी घेतली. अंगावर गरम कपडे चढवले. काठीला कंदील बांधला आणि पंख हलवीत उडून गेला की आभाळात पठ्ठ्या !

होता होता मग झिपऱ्यानं लांब लांबचं जंगल गाठलं. तिथं जागा बघितली. झाडांचे बुंधे पाहिले. आणि माघारी आला. तर वाटेत कुदळी, फावडी, घमेली, करवती, कुऱ्हाडी, असली आयुधं पडलेली. त्यामुळं झाडांचा निकाल खरंच लागणार हे त्यानं ओळखलं न् रातोरात सगळ्यांना घेऊन त्या दुसऱ्या जंगलात गेला. पण ससोबांनी काय गंमत केली की, ती सगळी हत्यारं नेली आपल्याबरोबर पळवून आणि तिकडच्या जंगलात नवी घरं बांधायचा बेत केला. आहे की नाही म्हणजे ?

इकडे तोवर झाडं तोडणारी माणसं आली तर त्यांची हत्यारं कुठं होती जाग्यावर ? त्यांना नवल वाटलं ! भुताटकी झाली म्हणाले न् कपाळ बडवून घेत माघारी गेले. झिपऱ्याच्या एका दोस्तानं ते पाहिलं मात्र आणि पळत जाऊन पुटपुटले, “अशानं असं आहे” असली एकमेकात बडबड केली. तेवढ्यात कंदील घेऊन झिपऱ्या पुन्हा आभाळात उडत उडत इथं आला न् त्यानं निवडक मित्रमंडळी बरोबर आणून झाडाच्या ढोलीत घुमायला सुरुवात केली.

दुसऱ्या दिवशी पुन्हा झाडं तोडणारे लाकूडतोडे आले तर हा चमत्कार ! गेले भुलून, पळाले भिऊन.

असं मग बरेच दिवस असंच झालं. शेवटी त्या लाकूडतोड्यांनी झाडं तोडायचा बेत रद्द केला आणि सकाळी परत तिथं येऊन देवाला हात जोडीत माघारी जावं म्हटलं.

झिपऱ्यानं ससोबांना ही बातमी कळवली आणि पुन्हा सगळ्यांना घेऊन ससोबा ह्या आपल्या घरी लव्याजम्यानिशी माघारी आले.

लाकूडतोडे लोक सकाळी उजाडत ठरल्याप्रमाणे आले तर आणखीन चमत्कार हं ! त्यांची सगळी हरवलेली हत्यारं पुन्हा जिथल्या तिथं होती आणि झाडांनीदेखील आता बोलून बोलून धिंगाणा घालून सोडला होता. त्या कारणानं त्यांनी ती हत्यारंही तिथंच सोडून दिली, आणि जीव घेऊन तिथून पळ काढला.

झालं ! झिपऱ्याचा आनंद गगनात मावेना. ससोबांना अस्मान ठेंगणं झालं आणि इतरांनी नुसता जल्लोष उडवून दिला. आपण जिंकली या समाधानात त्यांनी जंगी मेजवानी केली आणि झाडून सगळ्या जंगलाच्या राजांना निमंत्रण केलं. त्यावेळी सर्वांनी झिपऱ्याचं वारेमाप कौतुक केलं. आणि ससोबांना पोटभर शाबासकी देत त्यांनी ते जंगल आरडून ओरडून दणाणून सोडलं अगदी !

त्यांचं पहिलं घर आता त्यांनी असं शिणगारून टाकलं होतं की, तिथंच येऊन रहायचा बेत त्यांनी केला तर ! देवाशपथ खरं ! विचारा पाहिजे तर कुणाला पण. खुद्द ससोबा न् झिपऱ्या-देखील हेच बोलतील तर मग इतरांची हो काय कथा !





# मेघी राजा

**निवेदक : डॉ. श्याम परमार**

एक होता मेघी राजा. मोठा भरभक्कम. ताजा तवाना. रंगानं काळा. पण मोठा ऐटबाज. मनात आलं की, आभाळात उंच उंच भरारी मारायचा. धावत्या ढगांना पकडायचा. त्यांची मानगूट

धरायचा. धक्काबुक्की करायचा. त्यामुळं पाऊस अवचितच पडायचा. माणसं मग, आच्यारी का विच्यारी व्हायची. ते बघून हा असा हसायचा की, दोन पर्वतांची टक्करच जणू झालीय असा दणका उडायचा! त्याच्याजवळ एक छानदार लहान पिशवी असायची. देवानं ती त्याला दिलेली होती. म्हणून ती तो आपल्या केसात लपवून ठेवायचा. पण हा खुशीत आला की, ती एकदम चकाकायची. मग अंधार असू दे नाही तर उजेड असू दे.

विंध्य पर्वताच्या जंगलात मेधी राजाचं राज्य होतं. आदिवासींचा तो आवडता होता. त्याच्या आदेशाप्रमाणं त्यांनी वागावं आणि त्याच्या दबदब्याखाली रहावं असं असायचं.

तर एकदा काय झालं की, मेधी राजानं गिल्ली राजाची कळ काढली. अवचितच गेला न् त्याच्या दाढीमिशा कातरून आला! आला ते थेट आभाळातच उडून गेला. गिल्ली राजाला कळायच्या आत हं अगदी! दुसऱ्या दिवशी गिल्ली राजानं या गोष्टीचा वचपा काढावा म्हणून आपल्याच लेकीची वेणी कापून घेतली! ती लागली रडायला. पण ह्यानं लक्षच दिलं नाही. रडू दे म्हणाला. त्यानं मग फौजेला इशारा दिला की, कसंही करून मेधी राजाला जिवंत पकडून आणा.

राजाचीच आज्ञा. मग काय? सगळ्या फौजफाट्यानं जंगल, पहाड, गुहा, दरी, खोरी पार धुंडाळून काढली. अखेर शेवटी दोन दिवसांनी एका पहाडाच्या माथ्यावर मेधी राजा गवसला. सैनिकांनी त्याला पकडून गिल्ली राजाकडे आणलं. राजानं त्याच्याकडे रागानं पाहिलं न् म्हटलं, "ये, असा पुढं ये. तुला मंगलजी वाण्याकडे पाठवून जबर सजा देतो." आणि दिला तिकडे पाठवून.

मंगलजी वाणी मोठा करारी होता. त्यानं आपले मोठे नेत्र उघडून ह्याच्याकडे पाहिलं. आपल्या भल्या दांडग्या मिशा कुरवाळल्या. खदखदून हसला आणि म्हणाला, "जा, या पाजीला

माणसाला घेऊन जा. मी याचं तोंडही बघू इच्छित नाही. याला कोंडवाड्यात फेकून द्या. पहातो मग कशी मस्ती करतो ते."

मेथी राजा पण कमी नव्हता. कोंडवाड्यात आणल्याबरोबर त्यानं जिकडं तिकडं पाणीच पाणी करून सोडलं. त्या पाण्याचा लोंढा मंगलजी वाण्याच्या दारात गेला! ते बघून तो घाबरून गेला आणि पळत पळत गिल्ली राजाकडे आला. त्यावेळी हा राजा पान खात बसला होता. त्यानं ह्याचं बोलणं ऐकलं. मंगलजीनं गयावया करीत ह्या मेथी राजापासून आपलं रक्षण कर अशी राजाला गळ घातली. त्यामुळं गिल्ली राजानं मेथी राजाला एका गरम खोलीत कोंडून टाकलं. पण मेथी राजानं तिथंही पाणीच पाणी करून सोडलं. सगळीकडे धुराचे लोटच लोट पसरले. राजा त्यामुळं संतापून ओरडला, "ह्याला पुन्या बंदोबस्तात ठेवून द्या! . . ."

सैनिकांनी मग ह्याला जंगलात नेलं. ठार मारायचा बेत केला. मेथी राजा त्यामुळं रडू लागला. सैनिकाला दया आली. त्यानं मग ही सजा मोठी होईल म्हणून सांबराच्या शिंगात बंदिवान केलं. तिथं मग हा गुपचूप पडून राहिला. थोडे दिवस हे कुणाला कळलंही नाही. होता होता काय झालं की, जिकडं तिकडं दुष्काळ पडला. हाहा:कार उडून गेला. धनधान्य संपून गेलं. लोक मरायला लागले. दगाफटका होऊ लागला. अपघात घडू लागले. नदीचं पाणी आटलं. जमिनीला तडे पडले. त्यामुळं गिल्ली राजाकडे लोक तक्रार घेऊन गेले. तो चिंताक्रांत झाला. पाऊस कोठून आणावा? धान्य कोठून आणावं? लोकांना काय खायला द्यावं? त्याचा जीव उडून गेला. रात्रंदिवस चिंता लागली. झोप उडाली. राजानं मग दरबार भरवला. मेथी राजाला शोधून आणील त्याला मोठ्ठं बक्षीस जाहीर केलं. पैजेचा विडा पुढं ठेवला. पण चटकन कोणी पुढं येईचना. राजानं पुन्हा पुन्हा हे जाहीर केलं. पण छे! कोणी वर मान करीनाच. अखेर शेवटी एक जोगीण पुढं आली. तिनं हा पैजेचा विडा उचलला.

जोगिणीनं मग सगळीकडे तपास केला. सांबराच्या शिंगाजवळ ती गेली. चारी बाजूंनी ते बंदिस्त होतं. म्हणून तिनं मेघी राजाला हाकारा घालीत विचारलं, “जागा आहेस का झोपला आहेस?”

मेघी राजानं आतून उत्तर केलं, “मी तर झोपलोही नाही किंवा जागाही नाही.”

“मग बाहेर का येत नाहीस?”

“माझ्या मनाची मर्जी.”

“कशात बिघडलंय?”

“समजेल ते समजून घे.”

“तुला हवंय काय?”

“गिल्ली राजाच्या मुलीशी लगीन.”

जोगीण हसली. तिनं मेघी राजाची विनंती मान्य केली. राजाची समजूत घालीन म्हणाली. पण मेघी राजाला सांबर शिंगातून बाहेर कुठं येता येतंय? धड शिंग फुटेना की हा पण बाहेर येईना! खूप धडपड केली. पण काहीच नाही.

जोगीण मग पळत गेली. तिनं रेशीम दोरा आणला. सोन्याची सुरी आणली. मोत्यांचा घाव आणला. मग चारी बाजूंनी शिंग गच्च बांधून तिनं ते घाव घालीत फोडलं तेव्हा कुठं मेघी राजा बाहेर आला. त्यावेळी त्याला बघून एकदम आकाश गरजलं. मुसळधार पाऊस आला. नदी नाले भरून गेले. जमीन शांत झाली. लोकांना बरं वाटलं.

गिल्ली राजानं मग हात जोडून मेघी राजाची क्षमा मागितली. आपल्या लेकीशी त्याचं लगीन लावून दिलं. मग म्हणाला, “मी नावाचा राजा. पण तूच खरा राजा. पावसाचं पाखरू तू. दुनिया तुझ्यामुळं जगते. तुझ्यामुळं सुखावते. तू खरा मोठा.”

मेघी राजानं मग सगळीकडे आनंदी आनंद करून सोडला. तसा तो तुम्ही आम्ही पण करू या.



# कपिला गाय

**निवेदिका :**

**सौ. कुमुदिनी पवार**



कोण्या एके काळी एका गावात एक गरीब माणूस रहायचा. त्याला एक जहांबाज बायकू. घरात एक तिची न् एक तिच्या सवतीची लेक. सवत मरून गेलेली. पण पोरगी कशी नक्षत्रागत देखणी. जाईच्या फुलागत

नाजूक. पण हिला तिचा दांडगा दुस्वास. सारं कवतिक आपल्याच लेकीचं हिला. म्हणून ह्या पोरीला भारी मारायची. पाठ सोलावी जशी काय असे दणके घालायची. पोरगी कळवळायची. बापाचं बिच्याऱ्याचं काळीज तुटायचं. पण बायकूपुढं नमनारायण! काय एक त्याचं चालायचंच नाही तर!

बरं सावतरपणा तरी किती करावा ह्या मेलीनं? शिळं पाकं तुकडं खायला द्यायची त्या पोरीला. मोटभर घुणं बडवायला लावायची. रोज घरदार उभंकडवी सारवायला लावायची. गाडाभर भांडी घासायलं सांगायची. गोठ्यातल्या जनावरांचं शेणमूत काढायला लावायची. शिवाय सगळा सैपाक. पोरं पार वाळून गेली ह्या धबडग्यानं.

ह्या भैनी भैनी मातूर एका ज़िवानं असायच्या. एकमेकींच्या ताटात बसून जेवायच्या. कामाला हातभार लावायच्या.

पण आईला ते खपायचं नाही. म्हणताना एक दिवस रगत उसळस्तवर आईनं ह्या सावतर पोरीला वल्या चिपाडानं बडीवली. घरातून चालती हो म्हणाली. दरादरा आपल्या लेकीला वडीत मागं आणली. त्यासरशी एक चमत्कार झाला हं!

गोठ्यातल्या दावणीची गाय सुटली. गेली हांबरत ह्या पोरीच्या मागनं. तिनं तिच्या अंगाला घुसळण घातली. हिला चाटली. आपल्या अंगावर बस म्हटलं न लांब लांब घेऊन गेली. पार नजरेच्या पल्याड गेली. तिथं देवाघरची कपिला गाय रानात चरत होती. ह्या पोरीला बघितल्यासरशी तिला दूध फुटलं. पोरगी भुकेनं व्याकूळ झाल्याली. घटाघट दूध पेली न् निंजली.

होता होता कपिला गाईचं शेपूट धरून मग ती लांब जंगलात गेली. जशा काय मायालेकीच दोघी अशा मायेनं राहिल्या त्या.

इकडे एक दिवस घरात त्या जहांबाज बायकूनं लेकीचं लगीन काढलं. देवाला कंकोत्री दिली. पै पावण्यांला आवातनं केलं.

गणगोतांला बोलावणं केलं. वाजंत्री तुऱ्यांचा भडिमार झाला. भैनीच्या आठवणीनं नवरी हिरमुसली. थरारली. काळवंडली. असचील तिथनं येऊन पोटाशी धर म्हणून काकुलतीनं बोलली.

तेवढयात एक चमत्कार झाला देवा. आभाळाचं पोट फाटलं. काळा ढग गळला. ढगांच्या मंडपातून उजेड आला. कपिला गाय लक्ष्मीच्या रूपानं धावून आली. संगं ह्या लाडकीला घेऊन आली. सगळीकडं तेज पसरलं. मंडप गजबजून उठला. भैनीला भैन भेटली. झोकात लगीन लागलं. इंद्रदेव दिकून अक्षता टाकाय आलता तर गा ?



# माणकाचं फूल



**निवेदिका : सौ. शरदिनी मोहिते**

आटपाट नगर होतं. तिथं एक राजा राज्य करीत होता. राज्य मोठं सुखाचं होतं. या राजाला मुलगा नव्हता खरा, पण एकुलती एक अशी एक अतिशय सुंदर, अतिशय गुणी अशी मुलगी होती.

मुलीचं नाव होतं चंद्रप्रभा. नावाप्रमाणंच ही चंद्राच्या शीतळ प्रकाशानं आल्हाद द्यावा तसा सर्वांना आल्हाद द्यायची. साऱ्यांचाच चंद्रप्रभेवर जीव होता. राजालाच काय, राणीलाच काय, प्रजेलाही तिचं खूप कौतुक वाटायचं. त्यामुळे चंद्रप्रभा उपवर झाली त्यावेळी तिला योग्य असाच चांगलासा वर मिळावा म्हणून राजाप्रमाणंच साऱ्यांनाच मोठी हुरहूर लागून राहिली होती.

चंद्रप्रभेच्या स्वयंवराची योजना झाली. स्वयंवरासाठी भव्य मांडव उभारला गेला आणि वैभवाला साजेसा नटवलाही गेला. निरनिराळ्या देशांचे राजे, युवराजे तिथं येणार होते. त्यांची सर्वांची राजेशाही व्यवस्था ठेवण्यात आली होती. उत्तम उंची आसनं मांडवात मांडली गेली होती. स्वयंवराच्या दिवशी एकच धमाल उडाली.एकच लगबग दाटून राहिली होती. विशेष म्हणजे कसलाही पण लावलेला नव्हता मग तो जिंकण्याचा प्रश्नच नव्हता. तथापि सारे शूर राजे युवराजे मोठ्या उत्सुकतेने मांडवातील आसनांवर बसले होते.

वधूच्या वेषात नटलेली सुंदर चंद्रप्रभा हातात लगीनमाळ घेऊन आपल्या सखीबरोबर मांडवात आली. लगीनमाळ हातात घेऊन ही या राजे युवराजांच्या आसनांपुढून हळूहळू जात होती. चंद्रप्रभेला त्या त्या व्यक्तीची माहिती सांगण्यात येत होती. मंद हसत शांतपणे चंद्रप्रभा माहिती ऐकून घ्यायची, आणि त्या त्या आसनावर बसलेल्यांकडे एक नजर टाकून हळूच पुढे जायची. चंद्रप्रभा पुढेच जात होती. अजून तिनं कोणालाच पसंत केलं नव्हतं. बऱ्याच जणांची त्यामुळं निराशा झाली होती. राजाच्या चेहऱ्यावर काळजी उमटू लागली होती. तरी तो निरनिराळ्या देशांच्या निरनिराळ्या राजांची युवराजांची माहिती चंद्रप्रभेला सांगतच राहिला होता... होता होता मग एका आसनाजवळ राजा व चंद्रप्रभा ही आली. राजानं माहिती सांगायला सुरुवात केली. चंद्रप्रभेनं आसनावर बसलेल्या तेजस्वी विक्रमाकडे पाहिलं आणि तिला तो पसंत पडला.

तिनं आपल्या वडिलांकडेही पाहिलं. ते विक्रमाकडे मोठ्या आपुलकीनं पहात बोलत होते. हे पाहून चंद्रप्रभेचा विचार पक्का झाला आणि तिनं विक्रमाच्या गळ्यात लगीनमाळ घातली.

अलकापुरीच्या तरुण युवराजाचं, विक्रमाचं, जावई म्हणून खूपच कौतुक झालं. विक्रमाच्या आणि चंद्रप्रभेच्या विवाहाचा सोहळा हौसेनं आणि दिमाखानं साजरा झाला. राजेशाही इतमामानं चंद्रप्रभेची पाठवणी सासरी झाली. चंद्रप्रभा आपल्या लवाजम्यासह विक्रमबरोबर अलकापुरीकडे निघाली... वऱ्हाड वाटचाल करीत होतं. इतक्यात त्याची पवनखिंड नावाच्या खिंडीजवळ अडवणूक झाली. मोठ्या आनंदात मग्न असलेलं वऱ्हाड बावरलं खरं पण लगेच अचानक झालेल्या हल्ल्याला तोंड द्यायलाही सरसावलं...

गोष्ट अशी होती की, चंद्रप्रभेच्या स्वयंवराला कमलपूरचा राजा शूरसेन हाही आला होता. मोठ्या हौसेनं आणि आशेनं आला होता तो. परंतु चंद्रप्रभेनं त्याला नाकारलं होतं. त्याच्या आसनापुढून जाताना नाक मुरडलं होतं. हे पाहून शूरसेनाचा जळफळाट उडाला होता. विक्रमला चंद्रप्रभेनं माळ घातल्यावर विक्रमच्या नि चंद्रप्रभेच्या जयजयकाराची जी लाट उसळली होती त्याच वेळी हा अचानक मांडवातून निघून गेला होता...आणि गेला होता तोही.लग्नात विघ्न आणण्याचा पण करूनच...कमलपूरला जाऊन त्यानं आपलं बरचसं सैन्य गोळा केलं. आपला जादूगार मित्र कुमारील याला बरोबर घेतलं आणि पवनखिंडीकडे कूच केली...लग्नाचं वऱ्हाड अलकापुरीकडे जात असताना हल्ला करायला ते सारे सज्ज झाले होते...

त्यामुळं वऱ्हाड पवनखिंडीशी येताच त्याच्यावर जोराचा हल्ला केला होता. नवऱ्या मुलासकट सारेजण लढू लागले होते. चांगलीच लढाई जुंपली आणि लढाईच्या नादात सारेजण असतानाच जादूगार कुमारील चंद्रप्रभेजवळ गेला!... जादूचा मंत्र म्हणवून त्यानं

चंद्रप्रभेला फूल बनवून टाकलं! . . . मौल्यवान माणकांचं फूल! ते देखणं फूल आपल्या मंदिलाच्या तुऱ्यात खोवून तो कमलपूरला येऊन दाखलही झाला! . . .

मुलगी सासरी जात असताना वाटेतच हल्ला होऊन लढाई जुंपली असल्याची बातमी राजाला कळली होती म्हणून आपलंही निवडक सैन्य घेऊन तो मदतीला आला होता. कमलपूरच्या शूर-सेनाच्या सैनिकांनी माघार घेतली होती. शूरसेनानं तर सर्वांच्या अगोदर पळ काढला होता आणि कमलपुरातल्या आपल्या राज-वाड्यात येऊन तो पोचलादेखील होता.

लढाईत मार खाऊन आला होता तरी शूरसेन आपल्या जादूगार मित्राला सुखरूप आलेला पाहून आनंदला होता. लढाईत झालेली फजिती ध्यानात न घेता तो निर्लज्जपणे चंद्रप्रभेची चौकशी करू लागला. शूरसेनाचा हा निर्लज्जपणा पाहून जादूगार कुमारीलनं एक डाव आखला. राजाला न कळेल अशा बेतानं त्यानं आपल्या मंदिलातलं माणकांचं फूल काढून लगोलग त्याच्यावर आणखी एक मंत्र घातला. त्यामुळं झालं काय की, त्या फुलाला काही प्रमाणात भावना निर्माण झाल्या. कुठलीही नावडती गोष्ट ऐकली की माणकांच्या फुलात गुप्त झालेली चंद्रप्रभा संताप दाखवू लागली. अशा वेळी फुलातली सारी माणकं एकमेकांवर थडाथड आपटून त्यातून गडद गुलाबी जाळ उठायला लागला! . . . राजाला या फुलाचं आश्चर्यच वाटलं. चंद्रप्रभा झाल्या प्रकारानं नुसती भडकून गेली होती. तो आधीचा तिचा संताप राजाच्या कुठल्याही बोलण्या-सरशी बेफाम व्हायचा आणि अशा वेळी माणकं एकमेकांवर आपटून गुलाबी जाळ उठायचा. हा प्रकार तीन चार वेळा झालेला पाहून राजानं विचारलं, "हे काय कुमारील? मी विचारतोय की चंद्रप्रभा कुठाय आणि तू उत्तर न देता गप्प का बसलास? आणि हे फूल कसलं? कुठून आणलं आहेस? निराळंच दिसतंय हे फूल? . . .

हे ऐकून कुमारील माणकांचं फूल दाखवीत म्हणाला, " महाराज, अहो हीच ती तुमची चंद्रप्रभा."

" म्हणजे ?" राजानं डोळे विस्फारीत विचारलं.

"अहो तिला तिच्या खऱ्या रूपात आणता आली असती का ? . . . सांगा ना ? . . . मग ? . . . मी तिला बनवलं माणकांचं फूल . . . ती आपल्यापुढं या तऱ्हेने हजर आहे महाराज.

राजा शूरसेन कमालीच्या उत्सुकतेनं पुढं झाला. आणि त्यानं कुमारीलच्या हातातल्या फुलाला हात लावला. त्याबरोबर माणकं एकमेकांवर आपटली आणि इतका तेजस्वी जाळ उठला की राजा त्याच्यामुळं जणू जळून खाक झाला ! काळा ठिक्कर पडला तो ! . . .

या प्रकारानं तो दुष्ट राजा इतका संतापला की त्या संतापाच्या भरात कुमारीलच्या थोबाडात मारीत त्यानं कर्कश आवाजात विचारलं, " कायरे ? काय प्रकार आहे सारा ?"

तेव्हा कुमारील गाल चोळीत म्हणाला, " महाराज, साधी-सुधी गोष्ट नाही ही. चंद्रप्रभा आहे ही. आपल्या गुणामुळं साऱ्यांची आवडती झालेली चंद्रप्रभा, ती अतिशय तेजस्वी आहे. तिला उपमर्द नाही सहन होणार कधीच."

" मग याला आता उपाय ? " राजानं जरा नरमतच विचारलं तेव्हा हा म्हणाला.

" मी सारं ठीक करून देऊ शकेन महाराज . . ."

" खरंच ? "

" पण एक अट आहे . . ."

" कोणती अट ?"

" आपण मला अर्ध राज्य दिलं पाहिजे."

हे शब्द ऐकताच कुमारीलचा मतलब ध्यानात येऊन राजा चिडून ओरडला, " कोण आहे रे तिकडे ? या स्वार्थी माणसाच्या हाता-पायांत बेडचा घालून त्याला अंधार कोठडीची हवा दाखवा ! . . . माझ्याशी खेळ खेळतोय ! . . ."

राजाचे शिपाई तिथं येऊन पहातात तो तिथं राजाशिवाय कोणीच उरलं नव्हतं. कुमारील माणकांच्या फुलासह अदृश्य झाला होता ! . . .

हा मतलबी जादूगार शूरसेनाच्या कमलपुरातून जो निघाला, तो अलकापुरीत विक्रमाच्या पुढ्यात येऊन उभा राहिला. लग्न करून आलो खरं, पण वधू वाटेतच गमावली या विचारानं विक्रमासारखा सुंदर नि शूर पुरुष मलूल होऊन गेला होता. अशातही हा जादूगार त्याच्यापुढं येताच त्यानं त्याचं आगत स्वागत केलं आणि त्याची विचारपूस केली.

कुमारीलनं विक्रमलाच विचारायला सुरुवात केली, "युवराज, मला सारं कळलंय . . . काही पत्ता लागला की नाही अजून ?"

विक्रमनं उत्तर दिलं नाही. नुसती नकाराची मान हलवली. व विचारलं, "सारं खरं पण तुम्ही कोण ?"

तेव्हाही कुमारीलनं सरळ उत्तर दिलं नाही. तो म्हणाला, "मी जर शोध लावून दिला तर काय द्याल मला ?"

"काय हवं तुम्हांला ?"

"मला आपलं अर्धं राज्य द्याल का ?"

तर विक्रम म्हणाला, "महाराजांना सांगितलं पाहिजे हे."

मग दोघे विक्रमच्या वडिलांकडे गेले आणि त्यांना तसं विचारलं तेव्हा तो राजा धूर्तपणे म्हणाला, "हो, देऊ की अर्धं राज्य."

गंमत अशी होती की, एव्हापर्यंत राजानं योग्य बक्षीस देऊ एवढंच जाहीर केलं होतं. पण "हा कोण कुठला नि एकदम येऊन सांगतोय की मी वधूचा शोध लावून देतो न् मला अर्धं राज्य द्या." तेव्हा पाहू या हो म्हणून असा राजानं विचार केला.

आणि मग त्यानं सांगून टाकलं की "देईन अर्धं राज्य तुला. शोध लाव आमच्या सूनबाईचा."

कुमारीलनं तिथल्या तिथं ते माणकांचं फूल निर्माण केलं— दिसत नव्हतं ते दिसतं केलं. त्यावेळी ते फूल इतकं चमचमलं की, वाटलं खुदकन हसतंच आहे. राजा आणि विक्रम पहातच राहिले. लकाकणाऱ्या फुलाकडे बोट करीत राजा म्हणाला, "हे काय ?"

तशी कुमारील म्हणाला, "महाराज, युवराजांनी आपल्या स्वतःच्या उजव्या हाताच्या अंगठ्यातून रक्त काढून फुलाच्या देठाला तिलक लावावा."

"म्हणजे काय होईल ?"

"पहा तर खरं. . . आपल्याला हवं ते घडेल."

राजानं विक्रमला खुणावलं. विक्रमनं स्वतःची तलवार हाती घेत उजव्या हाताच्या अंगठ्याला जखम केली व पुढं होत त्या चमकत्या माणकांच्या फुलाला रक्ताचा टिळा लावला. त्यासरशी केवढं नवल घडलं. ते फूल जादूगाराच्या हातून हळूच सटकलं आणि आपल्या असंख्य पैलूंच्या चमचमाटानं साऱ्यांना दिपवीत त्यातली माणकं थरथरू लागली. बघता बघता फूल मानवी आकार घेऊ लागलं आणि त्या फुलामधून चंद्रप्रभा साजिवंत झाली. . .

हरवलेली ही गुणांची खाण समक्ष उभी राहिलेली पहाताच राजा गहिवरला. विक्रमाला आनंदानं काही सुचेनासं झालं. राजानं ही आनंदाची बातमी जाहीर केली आणि आनंदोत्सव सुरू करायला लावला. चंद्रप्रभेच्या आईवडिलांनाही हो गोष्ट कळवली. खूप खूप आनंद झाला सर्वांना.

चंद्रप्रभा तर चांगलीच सुखावली होती. पण सुखावली म्हणून सावधगिरी विसरली नव्हती. आनंदोत्सव साजरा होत असताना तिनं आपल्या नवऱ्याला, सासऱ्यांना नि सासूबाईंना एका महालात बोलावून सारी हकिगत सांगितली. आजवरची सारी हयात यानं दुष्ट शूरसेनाच्या सहवासात घालविली असल्यानं हा स्वतःही किती दुष्ट आहे ते सांगितलं, आणि म्हणाली "अर्ध राज्य द्यायचं

कबूल केलंत ते ठीकच केलंत, कारण त्याखेरीज पुन्हा त्यानं मला जिवंत केलंच नसतं. पण आता त्याचा काही तरी बंदोबस्त करा. स्वतःच्या मित्रावरही तो स्वतःच्या मतलबासाठी उलटला, तर तुम्हा आम्हांला किती छळेल. आज अर्ध राज्य मागितलं उद्या आणखी काही मागेल ते लगेच दिलं नाही की स्वतःच्या मंत्र-शक्तीचा अत्यंत आसुरी वापर करून तो आपल्याला पिडून टाकील. तेव्हा त्याला काहीच चाहूल लागू न देता त्याचा तात्काळ नाश करावा हे उत्तम नाही का? चंद्रप्रभेचं बोलणं सर्वांना पटलं, पण यातून नेमका मार्ग कोणता काढायचा हे कोणालाच सुचेना.

राणी म्हणजे चंद्रप्रभेची सासू म्हणाली, "सूनबाई तो माणूस दुष्ट हे तर खरंच. परंतु हेही लक्षात घेतलं पाहिजे की, त्याच्यामुळे तुझं एक प्रकारे रक्षणच झालं आहे. त्यानं तुझ्याशी वाईट वर्तन केलं नाही की दुष्ट शूरसेनाच्या ताब्यातही तुला दिलं नाही. तेव्हा त्याला ठार करणं मला पटत नाही."

"पण त्याच्या दुष्टबुद्धीवर नि मंत्रशक्तीवर वचक बसायला हवा ना?"

विक्रम मध्येच म्हणाला, "मंत्रशक्ती नाहीशी केली म्हणजे झालं."

राजा म्हणाला, "मंत्रशक्तीचा दुष्ट बुद्धीनं तो वापर करतोय खरा. ती नाहीशी व्हायला हवी. पण ती कशी करायची नाहीशी?"

विक्रम एकदम म्हणाला, "ठरलं, त्याची मंत्रशक्ती नाहीशी करणार मी. माझ्याकडे लागलं हे काम."

"छान, पण कुणी विरोध केला तरी मी त्याला अर्ध राज्य देणार. माझा शब्द मला जपला पाहिजे." राजा म्हणाला, यावर कुणीच काही म्हटलं नाही आणि त्यांची मसलतही इथेच थांबली.

विक्रमनं यानंतर खूप विचार केला आणि या बाबतीत राज वैद्याचा सल्ला घेऊन विचारलं, "त्याची मंत्रशक्ती तेवढी नाहीशी झाली पाहिजे. आहे का काही उपाय तुमच्याकडे?"

तेव्हा वैद्यानं विचार करून तशा तऱ्हेचं औषध शोधून काढलं. एक भस्म होतं ते . . . आता ते जादूगार कुमारील याला चारायचं कसं ? मग विक्रमनं एक थाटाची मेजवानी दिली आणि केवळ कुमारीलच्याच समोरच्या ताटातल्या दुधाच्या वाटीमध्ये ते भस्म पडेल याची त्यानं चोख व्यवस्था केली. नंतर त्या भस्मानं आपलं काम बजावलं.

कुमारीलची मंत्रशक्ती आणि दुष्ट बुद्धी नाहीशी झाली. या गोष्टीची खात्री करून घेण्यासाठी राजा उगीचच म्हणाला, "अर्ध राज्य द्यायचं म्हणजे चेष्टा आहे काय ? मी नाही देणार अर्ध राज्य. खूप मोलाचा नजराणा देतो हवं तर."

या शब्द पालटीनं कुमारील चकित झाला खरा. पण तो दबकला. एरवी चिडून त्यानं शाप दिला असता, समोरच्या निरनिराळ्या माणसांचे निरनिराळे प्रकार करून सोडले असते. पण तो एवढंच म्हणाला, "दिलेला शब्द न पाळणं शोभत नाही क्षत्रियाला."

मग सारं ठीक झालं. एक फार मोठी धास्ती साऱ्यांना दडपत होती ती नाहीशी झाली. जादूगार कुमारील एका छोट्या राज्याचा स्वामी झाला. मग राजा, राणी, विक्रम आणि चंद्रप्रभा सारीच सुखावली. आनंदित झाली. मोठ्या सुखानं दिवस चालले त्यांचे. काही काळानं राजा, राणी, चंद्रप्रभेचे आईवडील आपला राज्य-कारभार या दोघांवर सोपवून वनात निघून गेले. दोन्ही राज्यांची जबाबदारी अंगावर पडली. अशा वेळी काही भागात सीमा जुळलेलीच असल्यानं त्यांनी दोन्ही राज्ये एक करून टाकली आणि वरचेवर वनात जाऊन या थोर राजांचं मार्गदर्शन घेत, आशीर्वाद घेत दोघांनी सुखाचं आणि आनंदाचं राज्य केलं, आपल्या प्रजेचा दुवा घेतला. त्यांचं राज्य आनंदाचं झालं तसं ते तुमचं आमचं पण होवो.





# जीवदान

**निवेदक : श्री. श्रीपाद जोशी**

असाच एक राजपुत्र होता. तो दररोज एका सुशोभित नावेत बसून नदीतून फिरायला जायचा. त्यावेळी राजपुत्राच्या हातात एक गलोल असे आणि नावेत खडे भरून ठेवलेले असत. नदीच्या काठानं कुणी दिसलं रे दिसलं की, तो आपल्या गलोलीनं नेम धरून दगड मारायचा. आपल्या दगडानं एखाद्याचा डोळा फुटला, डोक्याला खोक पडली, डोईवरची मातीची घागर फुटून सारं अंग

पाण्यानं भिजून गेलं की, त्याला गंमत वाटे. दगडानं जखमी झालेला माणूस तळमळू लागला म्हणजे त्याला आनंदाच्या उकळ्या फुटत. तो जोरजोरानं पोट धरधरून हसू लागे.

तर एकदा काय झालं की, या राजपुत्राची नजर एका देखण्या मुलीवर पडली. ती साधीभोळी मुलगी आपल्या मातीच्या घागरीत नदीचं पाणी घेऊन घरी चालली होती. राजपुत्रानं तिच्या घागरीवर गलोलीनं खडा मारला आणि आपली नाव किनाऱ्याला लावण्याचा नावाड्यांना हुकूम दिला.

इकडे राजपुत्राच्या खड्यानं त्या मुलीची घागर फुटली होती म्हणून ती घाबरली होती. म्हणून आता ती तेथून पळून जाणार इतक्यात राजपुत्र तिथं पोचला आणि त्यानं तिला पकडलं. त्याबरोबर त्या मुलीच्या अंगात वीरश्री चढली. तिनं त्याचा हात झटकून टाकला आणि त्याची चांगली खरडपट्टी काढली, "तू राजपुत्र असून असला हलकटपणा करायला तुला लाज कशी वाटत नाही?"

तिच्या त्या कडक शब्दांनी राजपुत्राचा पारा जास्तच चढला. त्यानं त्या कोवळ्या मुलीच्या गालावर फाड फाड थपडा मारल्या. तशी ती मुलगी रडत ओरडत घराकडे गेली. परंतु जाता जाता ती राजपुत्राला एवढंच म्हणाली, "दुष्टा, आजवर तू नुसता दुरूनच लोकांना त्रास देत होतास, पण आता वायाबापड्यांच्या अंगावरही हात टाकू लागलास! जा! तू आंधळा होशील, जोपर्यंत तू माझ्या या गवताच्या चुंबळीची राख आपल्या डोळ्यांना लावणार नाहीस तोपर्यंत तू आंधळाच राहशील. देव माझी ही शापवाणी अवश्य खरी करील." त्या वेळी राजपुत्रानं तिच्या बोलण्याला मुळीच भीक घातली नाही.

पण रात्री जेव्हा तो झोपायला आपल्या महालात गेला तेव्हा एकाएकी त्याचे डोळे सुजले आणि दुसऱ्या दिवशी सकाळी तर त्याला काही दिसेनासंही झालं! तो खरोखरीच आंधळा झाला!

बादशहाला ही बातमी कळताच तो धावतच राजपुत्राच्या महालात गेला. आपल्या शाहजाद्याची ती अवस्था बघून त्याचं काळीज उडून गेलं. त्यानं ताबडतोब राजवैद्याला बोलावून घेतलं आणि राजपुत्राच्या डोळ्यांवर उपचार करायला सांगितलं. राजवैद्यानं आपल्याकडून प्रयत्नांची पराकाष्ठा केली. पण त्याला यश आलं नाही. मग बादशहानं देशोदेशींच्या वैद्यांना, हकिमांना बोलावून त्यांच्याकडून उपचार करविले. पीर-फकीर, साधू-बैरागी, जादू-टोणे, अंगारे-धुपारे, बकऱ्या-कोंबड्यांचे बळी वगैरे सारे उपाय करण्यात आले. परंतु कशाचाही उपयोग झाला नाही.

मग मात्र एक दिवशी बादशहा राजपुत्राला म्हणाला, "बाळ, तुला कुणाचा तरी शाप बाधलेला दिसतोय. खरं सांग, तू कुणाला त्रास दिला होतास काय?"

बापाचे हे शब्द ऐकताच राजपुत्राला त्या मुलीच्या शापाची आठवण झाली. त्यानं रडत रडत सारी हकिगत बादशहाला सांगितली आणि तो म्हणाला, "बाबा, मी जर तिच्या औषधानं बरा झालो तर मी तिला सख्ख्या बहिणीप्रमाणं वागवीन. काहीही करून तुम्ही तिचा ठावठिकाणा शोधून काढा. मी तिचे पाय धरीन. . .यापुढं कुणालाही मी त्रास देणार नाही."

दुसऱ्या दिवशी बादशहानं सगळीकडे दवंडी पिटवून जाहीर केलं की, "ज्या मुलीला राजपुत्रानं त्रास दिला होता तिच्या शापानं शाहजादा खरोखरीच आंधळा झाला आहे. तरी आता त्या मुलीनं आमच्यावर दया करून राजपुत्राचे डोळे पहिल्यासारखे करून द्यावेत. तिला आमचं अभय आहे. आम्ही तिला आमची मुलगी आणि राजपुत्राची वहीण मानतो."

त्या मुलीनं ही दवंडी ऐकली आणि बादशहाला निरोप धाडला की, "माझ्या भावाला जर खरोखरीच आपल्या कृत्याचा पश्चात्ताप झालेला असेल तर त्यानं माझ्याकडे येऊन उपचार करून घ्यावा.

मात्र ज्या थाटामाटात तो पूर्वी लोकांना त्रास द्यायला बाहेर पडत असे त्याच राजेशाही थाटात त्यानं माझ्याकडे आलं पाहिजे."

हा निरोप ऐकताच राजपुत्र उठला आणि पूर्वीच्याच थाटामाटानं नावेत बसून त्या मुलीच्या घरी गेला. तो दाराशी येताच त्या मुलीनं त्याला विचारलं, "भाऊ, तू आपला दुष्टपणा खरोखरीच सोडून दिलास काय ?"

राजपुत्र काकुळतीला येऊन म्हणाला, "ताई, देवाची शपथ घेऊन मी तुला सांगतो की, माझ्या जिवात जीव असेपर्यंत मी माझ्या माणसांना कधीही त्रास देणार नाही. तुझ्या गळ्याची शपथ, मी कधीही, कुणाही स्त्रीचा अपमान करणार नाही."

त्याचे ते तळमळीचे शब्द ऐकताच त्या मुलीची खात्री पटली. तिनं आपल्या गवताच्या चुंबळीतल्या चार काड्या काढून त्या जाळल्या आणि त्यांची राख राजपुत्राला देऊन ती म्हणाली, "भाऊ, ही राख घे अन् सुरम्यासारखी डोळ्यांत घाल. देव तुझं भलं करील."

राजपुत्रानं ती राख अंजनासारखी आपल्या डोळ्यांत घातली. त्याबरोबर त्याची दृष्टी पुन्हा परत आली. तो आनंदानं नाचू लागला. म्हणाला, "ताई, आज तू मला जणू जीवदान दिलंस. ऊठ. आता तुझं स्थान यापुढं या झोपडीत नाही. जिथं भाऊ तिथं बहीण. यापुढे तू माझ्याबरोबर राजवाड्यातच राहिलं पाहिजेस. माझी खरी पाठीराखी आता तूच."

राजपुत्र मग त्या मुलीला व तिच्या घरच्या सगळ्या मंडळींना घेऊन राजवाड्यात रहायला गेला. सगळीकडे मग आनंदी आनंद झाला. सर्वजण सुखात राहू लागले. तसे तुम्ही आम्ही पण राहू या.



# हडळीची दासी

निवेदक : डॉ. म. अ. दळवी

अशीच आपली दोन लहान मुलं होती. भाऊ आणि बहीण. त्यांचं एकमेकांवर खूप प्रेम होतं. पण त्यांना आई नव्हती. त्यांच्या वडिलांना खूप वाईट वाटे. वडील शेतकरी. काही दिवस त्यांनी तसेच रेटून नेले. शेवटी मुलांच्या कोवळ्या वयाकडं पाहून शेतकऱ्यानं दुसरं



लग्न केलं. सावत्र आई घरात आली. पण त्यांना सुखी करावयाचं सोडून ती बाई त्या मुलांचा काटा कसा काढता येईल याच प्रयत्नात गुंतली. एक दिवस ती मुलांना म्हणाली, "बाळांनो इथं तुम्हांला खूपच काम पडतं. मी किनई तुम्हांला माझ्या आजीकडं पाठवणार आहे. तिथं मजाच मजा करायला मिळेल तुम्हांला. जाणार ना तुम्ही ?"

मुलांना तिचा कावा कळला नाही. त्यांनी माना डोलावल्या. हो म्हटलं. मग त्यांना कसं जावयाचं तोही मार्ग हिनं सांगितला.

पण तिकडे जाण्यापूर्वी मुलं गावातच रहात असलेल्या आपल्या आजीकडं गेली. आईनं जे सांगितलं ते आजीला त्यांनी सांगितलं. त्या माऊलीच्या डोळ्यांत पाणी उभं राहिलं. तिला हबकाच बसला. ती म्हणाली, "बाळांनो, मी इतकी म्हातारी आहे की, मला तुमच्यासाठी काहीच करता येत नाही. पण मी वाटेसाठी तुम्हांला दूध, भाकर, तळलेलं न थोडंसं मांसही देते. ते तुम्ही घ्या आणि जा. देव तुमचं कल्याण करो."

आजीचा निरोप घेऊन ती दोन्ही मुलं सांगितलेल्या वाटेनं भर जंगलात आली. तिथं त्यांना एक जुनी झोपडी दिसली. ती अगदी पडीक होती. दगडामातीची बांधलेली अशी होती. जुनाट पेंढ्यांचं असंख्य भोकं पडलेले असं तिचं छत होतं. आत कोणी तरी एक म्हातारी या दारातून त्या दारापर्यंत अस्ताव्यस्त पडलेली होती. तर मुलांची चाहूल तिला लागताच ती चवताळून ओरडली, "कोण आहे तिथं ?"

क्षणभर मुलं घाबरली. पण आपल्या गोड आवाजात त्यांनी तिला सांगितलं, "आजीबाई, आम्ही आलो आहोत आपल्या सेवेसाठी."

"अस्सं होय ? ठीक आहे तर. मी सांगेन ते काम करा म्हणजे मी तुम्हांला बक्षीस देईन. नाही केलंत तर खाऊन टाकीन." असं

म्हणून त्यांना तिनं वरात घेतलं, कामं वाटून दिली आणि स्वत: पेंढ्याच्या एका मोळीवर वसून निघून गेली.

मुलीला काम दिलं होतं तें कापड विणण्याचं. पण ती इतकी लहान होती की, तिला कोठलं आलंय ते यायला? ती मुळूमुळू रडू लागली. तेवढ्यात उंदीरच उंदीर तिथे धावून आले. त्यांच्या पुढाऱ्यानं ती का रडते आहे यावद्दल विचारलं. कारण समजताच त्यानं म्हटलं, "त्यात काय आहे एवढं मोठं? आम्हांला काही खायला दे आणि त्या मांजरापासून आमचं रक्षण कर म्हणजे आम्ही विणून देऊ ते कापड."

तिकडे विहिरीवर भाऊही रडत होता. त्याच्याकडं काम आलं होतं पोहऱ्यानं पाणी शेंदण्याचं. पण त्या पोहऱ्याला इतकी भोकं होती की, त्यातून सारं पाणी तेव्हाच गळून जायचं. तिथल्या झाडावर काही कबुतरं होती. शेजारीच असलेल्या त्यांच्या राजानं या मुलाला म्हटलं, "आम्हांला काही खायला दे. आम्ही पोहरा दुरुस्त करू." भाऊ का रडतो आहे हे पहावयाला बहीण वाहेर आली. आपल्या-जवळच्या भाकरीचे काही तुकडे तिनं उंदरांना दिले. कबुतरांची गरज पाहून त्यांनाही दिले. उंदीर कापड विणू लागले. कबुतरं चोचीत चिवट गोंद आणून पोहऱ्याची भोकं बुजवू लागली. मुलानं पाणी भरलं. नंतर ती दोघे आत आली. पहातात तो उंदरांनी कापड विणलेलं होतं. पण मांजर त्यांच्यावर हल्ला करावयाला टपलं होत.

ती दोघेही मांजराकडं धावली. "मनुताई मनुताई, भूक लागली आहे होय तुला? दादा, एक मांसाचा तुकडा आण बरं मनुताईला". भावानं एक तुकडा आणला. मांजर तो मिटक्या मारीत चघळू लागलं. ती संधी साधून उंदीर पळून गले. भाऊही मांजराला गोंजारू लागला. तेवढ्यात त्याला काय वाटलं कुणास ठाऊक, मांजराला त्यानं हटकलं, "मनुताई, ही म्हातारी बाई आमची आजी दिसत नाही. ती तर हडळ दिसते आहे. तुला ठाऊक आहे का तिच्यापासून पळून कसं जायचं ते?"

त्यांच्या प्रेमळ वागणुकीनं मांजर खूष झालं होतं. म्हणून ते म्हणालं, "आहे ठाऊक. तिचा कंगवा आणि हातरुमाल ह्या वस्तू ज्याच्याजवळ आहेत त्याला येथून सहज पळून जाता येईल." या वस्तू कशा उपयोगात आणावयाच्या ते मांजरानं मग त्यांना सांगितलं. त्यांना ते ऐकून मोठा आनंद झाला.

मग त्या दोघांनी सारी झोपडी स्वच्छ केली. कापड विणून ठेवलं, पाणी भरून ठेवलं. तेवढ्यात हडळ तिथं येऊन दाखल झाली. "ठीक ठीक." ती म्हणाली, "उद्याचं काम जर नीट केलं नाहीत तर. . . ." मुलं भीतीनं कापू लागली. ती भयंकर क्रूर आवाजात बोलत होती, म्हणून "आम्ही करू, आम्ही करू" असं ती मुलं घाबरत घाबरत म्हणाली. हडळीला पुढं बोलण्याची गरज उरली नव्हती. ती डाराडूर झोपली. ती संधी साधून मुलांनी तिचा कंगवा आणि हातरुमाल या वस्तू आपल्या कपड्यात कोणाला दिसणार नाहीत अशा लपवल्या.

दुसऱ्या दिवशी सकाळ होताच हडळ पेंढ्याच्या मोळीवर बसून निघून गेली. मुलांना मोठं बिकट काम सांगावयाचं होतं तिला. पण ती विसरूनच गेली. मुलांना ते बरं वाटलं, त्यांनी मांजरानं सांगितलेल्या गोष्टी लक्षात ठेवून तेथून काढता पाय घेतला. पण हडळीच्या कुत्र्यानं त्यांना अडवलं.

मुलगा थांबला, त्यानं त्याच्या अंगावर प्रेमानं हात फिरवला. आपल्या पिशवीतून एक मांसाचा हाड असलेला तुकडा त्यानं कुत्र्याला दिला. कुत्रा एकदम खूष होऊन तो चघळू लागला. मुलगा म्हणाला, "मोत्या, मोत्या, आम्ही येतो हं !"

पुढं मग काही अंतर ती दोघे चालून गेली. झोपडीचं कुंपण आलं. तिथं सूर्यासारखी पानं असलेली दाट व खूप उंच झाडे होती. आतून पलीकडं जाणं कठीण होतं. मुलीनं आपल्या केसांना बांधलेले रेशमी पट्टे काढले व त्या झाडांच्या निमुळत्या फांद्या एकत्र बांधल्या. त्यातून

दोघांना जाण्याइतकी वाट मिळाली. आता ती दोघे मोकळ्या जागेत आली होती. जी वाट समोर दिसली ती त्यांनी धरली होती. खूप चालून झालं होतं त्यांचं. दूरवर गाव दिसू लागलं होतं. तिथल्या एका चिंचेच्या झाडाखाली विसावा घ्यावयाला ती बसली. शिदोरी सोडून काही खाऊ लागली.

अंमळशानं हडळ परत आली. पण मुलं तिला दिसली नाहीत. तिनं विचारपूस सुरू केली. तिनं मांजराला विचारलं. मांजर म्हणालं, "मी नाही त्यांना अडवलं. इतकी वर्षं तुझी चाकरी केली. कधी एक प्रेमाचा शब्द बोललीस का तू ? कधी एक अन्नाचा तुकडा दिलास का तू ?" कुत्र्यानंही तसंच उत्तर दिलं. तो म्हणाला, "मला एक हाड तरी कधी दिलंस का तू ? उलट मला लाथा मारल्यास. तुलाच चावावं म्हणतोय मी". कुंपणही तसंच म्हणालं, "आम्हांला पाणी घातलेस का कधी ? आमची निगा ठेवलीस का कधी ? तुझेच डोळे फोडावेसे वाटताहेत आम्हांला".

ही उत्तरं ऐकून हडळीचा राग अनावर झाला. तापलेल्या तव्यासारखी ती लालबुंद झाली आणि त्याच आवेशात पेंढयाच्या मोळीवर बसून मुलांच्या शोधासाठी हवेत उडाली.

मुलांचं खाणं एव्हाना झालं होतं. तेवढ्यात त्यांना हडळीचा आकाशातून येण्याचा मागोसा लागला. क्षणभर ती भ्याली. पण मुलानं तत्परतेनं हडळीचा कंगवा बाहेर काढला आणि पाठ हडळीकडं करून तो तिच्या मार्गात टाकला. मांजरानं तसं करावयाला सांगितलं होतं. कंगवा जमिनीवर पडताच काटेरी वृक्षांचं रान हडळीच्या मार्गावर वेगानं पसरू लागलं. घटकाभरातच त्यानं हडळीला वेढा घातला. मुलं जीव घेऊन गावाच्या दिशेनं पळू लागली. ती आत वेशीवर पोचणार तेवढ्यात हडळीनं काट्यातून आपली सुटका करून घेऊन पुन्हा मुलांच्या दिशेनं आपली चाल सुरू केली. भावाच्या सूचनेवरून बहिणीनं त्वरेनं हडळीचा हातरुमाल काढला, पाठ

वळवली आणि मांजराच्या सांगण्याप्रमाणे तो मागं भिरकावून दिला. तो जमिनीवर पडताच एक मोठी दुथडी नदी हडळ आणि त्यांच्या मार्गात निर्माण झाली. हडळीला पाण्याचा स्पर्श झाला. त्या स्पर्शानं नदीच्या पलीकडच्या तीरावर जाण्याची शक्ती तिला राहिली नाही. मुलांची सुटका झाली. कारण हडळींना पाण्याचा स्पर्श चालत नाही.

मुलं सावकाश गावाकडं आली. त्यांना गाव ओळखीचा वाटला. ती आपल्या आजीच्या घरी गेली. आजीनं मोठ्या प्रेमानं त्यांना कुरवाळलं, देवाचे आभार मानले. त्यांना घेऊन ती त्यांच्या बापाकडं आली. त्यांना पहाताच तो आनंदानं वेडा झाला. त्यानं त्यांचे मटामटा मुके घेतले. तेवढ्यात गावभर चर्चा सुरू झाली. गावाच्या कडेनं दुथडी नदी आली. सर्वांना आनंद झाला. शेतकऱ्याला जेव्हा सारी हकिगत कळली तेव्हा त्यानं आपल्या दुसऱ्या बायकोला बोलावलं. तिची रवानगी त्यानं एका होडीत बसवून नदीपार करवली. हडळीनं आनंदानं तिची नाव आपल्याकडं ओढून घेतली. मुलांच्याऐवजी हडळीला आता चांगली धट्टीकट्टी दासी मिळाली. पलीकडील तीरावर मुलांची ती सावत्र आई कधीमधी गावकऱ्यांना दिसली की, अपसूकच त्यांच्या तोंडातून अजूनही शब्द फुटतात, “हडळीची दासी दिसतेय बरं का! सावधान!”





# भुताचे सात हंडे

**निवेदिका: डॉ. सौ. सविता जाजोदिया**

कोण्या एका गावात एक म्हातारा न् म्हातारी रहात होते. बिचारे अतिशय गरीब होते. त्यायला अंगभर वस्त्र मिळत नव्हते की जेवायला दोन घासही मिळत नव्हते. म्हातारी दळणकांडण

करून चार पैसे कसेबसे मिळवीत असे. पण तो म्हातारा मोठा आळशी होता. आठ आठ दिवस काहीही कामकाज न करता घरात नुसता पडून रहात असे. म्हातारीला त्यामुळे भारी राग यायचा. तिला वाटे की मी एवढी मर मर काम करते पण याच्या जिवाला त्याचं काहीच वाटत नाही. नुसता माशा उडवीत लोळत राहतो.

एकदा अशीच ती कामाच्या दगदगीने त्रासून गेली होती. त्यातच म्हाताऱ्याने जेवायला मागितले. झाले. म्हातारीचा संताप अनावर झाला. वसकन् ती म्हाताऱ्यावर ओरडली, "दोन वेळा नुसतं गिळायलं हवं. जरा हातपाय हालविले, काही कामधंदा केला तर काय झिजून जाल? मी मेलीनं तरी कुठंवर करावं?" म्हाताऱ्याला त्या दिवशी बायकोचं बोलणं फार लागलं. तो लगेच उठला, धनुष्यबाण घेतला आणि जंगलात जाऊन एक ससा मारून घेऊन आला. ससा पाहून म्हातारी खूष झाली. तिला वाटलं आपण टोचून बोललो म्हणून म्हाताऱ्यानं ससा मारून आणला.

त्यामुळेच दुसऱ्या दिवशीही ती म्हाताऱ्याला टाकून बोलली. अर्थात तिच्या अपेक्षेप्रमाणंच झालं. म्हातारा त्या दिवशीदेखील धनुष्यबाण घेऊन जंगलात शिकारीला गेला. पण त्या दिवशी काही त्याचं दैव बलवत्तर नव्हतं. दिवसभर बिचारा जंगलात भटकला. पण ससे आणि हरणं तर सोडाच साधा उंदीरदेखील त्याला कुठं दिसला नाही. होता होता संध्याकाळ झाली. अंधार पडू लागला. पोटात कावळे ओरडत होते. पण म्हाताऱ्याचं मन काही घरी जावयास तयार होईना. कारण त्याला माहीत होतं की, रिकाम्या हातानं घरी गेल्यास म्हातारी खेटरांनीच त्याची पूजा करील. त्याला दोन घास खायला देण्याऐवजी शिव्यांचीच लाखोली वाहील. म्हणून जंगलातच रात्र काढायचा विचार करून तो एका पिंपळाच्या झाडावर चढून बसला. पण बराच वेळ झाला तरी त्याला काही झोप येईना. एक तर झाडावरून खाली पडायची

भीती मनातून वाटत होती आणि दुसरं म्हणजे पोट रिकामं होतं. तेव्हा झोप येणार तरी कशी? म्हातारा आपला जागतच राहिला.

मध्यरात्रीच्या सुमारास एकदम गुडम्, गुडम्, धडाम्, धुडुम् दडाम्, दुडुम् असे निरनिराळे आवाज करीत सात हंडे घरंगळत म्हातारा बसला होता त्याच झाडाखाली आले. त्या हंडयांच्या बरोबर एक भूतही तिथं आलं. झाडाखाली आल्यावर भुताच्या इशाऱ्यावर ते सातही हंडे नाचू लागले. गुडुम्, गुडुम्, धडाम्, धुडुम्,— हंडे नाचत होते.

पण नाचता नाचता ते हंडे एकदम थांबले आणि त्या भुताला म्हणाले, "मालक, आज इथे माणसाचा वास येतोय" भुताने नाक फुगवून जोरात वास घेतला आणि म्हणाला, "येतोय खरा" मग त्यानं इकडे तिकडे नजर फिरवून पाहिलं. तेव्हा त्याला झाडावर बसलेला तो म्हातारा दिसला. बिचारा भीतीने थरथर कापत होता. भुतानं त्याला खाली उतरायला सांगितलं. तसा तो बिचकत बिचकत खाली उतरला. त्याला वाटले की, हे भूत आता नक्कीच आपल्याला खाऊन टाकील. पण ते भूत मोठं दयाळू होतं. त्यानं मोठ्या आपुलकीनं म्हाताऱ्याला विचारलं, "म्हातारेबाबा, रात्रीचे तुम्ही या जंगलात का बसला आहात? भुताच्या सौम्य आवाजानं म्हाताऱ्याला थोडा धीर आला, आणि त्यानं उत्तर दिलं," काय सांगू तुम्हांला माझी रडकथा? घरात पोटभर जेवायला मिळत नाही. म्हातारी रोज घालून पाडून बोलते. म्हणून शिकार करायला मी या जंगलात आलो. पण दिवसभर भटकूनही मला काही शिकार मिळाली नाही. आणि रिकाम्या हातानं घरी जायची माझी काही छाती नाही. कारण घरी गेल्यावर म्हातारी खायला तर द्यायची नाहीच पण शिव्या देत बसेल. तेव्हा तिच्या शिव्या ऐकत घरी उपाशी राहण्यापेक्षा या जंगलात राहिलेलं काय वाईट? असा विचार करून मी इथेच राहिलो."

म्हाताऱ्याची हकिगत ऐकून त्या भुताला त्याची दया आली आणि तो आपल्या हंड्यांना म्हणाला, "तुमच्यापैकी प्रत्येकात इतकं धन भरलेलं आहे की, एकजण जरी या म्हाताऱ्याबरोबर गेला तरी त्याचं जन्माचं दारिद्र्य नाहीसं होईल. बोला, याच्याबरोबर जायला कोण तयार आहे ?" त्या सात हंड्यांपैकी सहा हंड्यांनी तर नाकं मुरडली पण त्यांच्यापैकी एक हंडा जो फुटका होता तो जायला तयार झाला. तेव्हा ते भूत म्हाताऱ्याला म्हणालं, "म्हातारेबाबा, हा हंडा तुम्ही घेऊन जा. याच्यामुळं तुमचं जन्माचं कल्याण होईल."

"पण मी आहे म्हातारा ! एवढा मोठा हंडा मला कसा उचलता येईल ? " म्हाताऱ्यानं विचारलं. तेव्हा भूत म्हणालं, "तुम्हांला काही हा हंडा उचलावा लागणार नाही. हा स्वत:च चालत तुमच्या घरी जाईल. जा आता."

म्हाताऱ्यानं भुताचा निरोप घेतला. फुटक्या हंड्यानं आपल्या बरोबरीच्या त्या सहा हंड्यांचा निरोप घेतला आणि दोघेही चालत चालत म्हाताऱ्याच्या घरी निघाले. पुढे पुढे म्हातारा चालला होता आणि पाठोपाठ दुडुम् दुडुम् करीत तो फुटका हंडा चालला होता. घरी पोहोचल्यावर म्हाताऱ्यानं तो फुटका हंडा एका खोलीत ठेवला आणि स्वत: अंगणात झोपी गेला.

सकाळी उठल्यावर म्हातारीनं म्हाताऱ्याला पाहताच तोफांची सरबत्ती सुरू केली. "रिकामे हात हलवीत परत आलात ना ? तुम्ही तसेच यायचे. काम करायची कवडीइतकी अक्कल असेल तर ना ?"

"ए उगाच वटवट करू नकोस. त्या खोलीत जाऊन बघ म्हणजे कळेल मी रिकाम्या हातानं आलो की, कसा आलो ते . . ." म्हातारा खेकसला.

म्हातारी तरातरा त्या खोलीत गेली. तर खोलीत तिला एक फुटका हंडा ठेवलेला दिसला. लगेच दाण्दाण् पाय आपटीत ती म्हाताऱ्याजवळ आली आणि ओरडली, "माझं नशीब फुटकं होतं

तेवढं बस नाही वाटतं झालं ? आणखी भर म्हणून हा फुटका हंडा कशाला घरात आणलात ?"

"अग पण त्या फुटक्या हंड्यात जरा डोकावून पाहिलंस तर काय बिघडणार आहे ?" म्हातारा चिडूनच म्हणाला. म्हातारी पुन्हा खोलीत गेली आणि तिनं हंड्यात बघितलं, तर तो रुपयांनी भरलेला तिला दिसला. मग काय विचारता ? तिच्या आनंदाला पारावार उरला नाही. लगबगीने त्यातून एक रुपया काढून तिनं त्याचं सामान आणलं आणि म्हाताऱ्याला ऊनऊन भाकरी जेवायला वाढली. दुसऱ्या दिवशी तिनं नवे कपडे विकत आणले, खायचं भरपूर सामान आणलं, दूधदुभत्यासाठी गायही खरेदी केली आणि काम करायचं सोडून त्या पैशावर म्हातारा-म्हातारी दोघेही सुखात राहू लागली.

पण त्या गावचा कोतवाल मोठा वाईट माणूस होता. त्यानं जेव्हा पाहिलं की, काही दिवसांपूर्वी अन्नाला महाग असलेले म्हातारा-म्हातारी आता चांगले आरामात रहाताहेत. तेव्हा त्याच्या मनात शंका आली. त्यानं लगेच म्हाताऱ्याला बोलावून विचारलं, "काय हो म्हातारेबुवा, कुठं चोरीबिरी केली की काय ?"

"छे छे ! मायबाप चोरीबिरी काही नाही केली." म्हातारा घाबरून म्हणाला. आणि त्यानं घडलेली सारी हकिगत कोतवालाला सांगून टाकली. ती ऐकून कोतवाल म्हणाला. अस्स ? पण मला काही तुमचं बोलणं खरं वाटत नाही. कसं काय घडलं ते तुम्ही मला प्रत्यक्ष दाखवायला हवं."

खरं म्हणजे त्या कोतवालाच्या तोंडाला पाणी सुटलं होतं, आणि आपल्यालाही ते दयाळू भूत एखादा हंडा देईल असं त्याला वाटलं होतं. पण तसं स्पष्टपणे न बोलता म्हाताऱ्याच्या बोलण्यावर अविश्वास दाखविण्याचं निमित्त त्यानं केलं. आणि त्याच दिवशी संध्याकाळी तो म्हाताऱ्याबरोबर जंगलातील त्या पिंपळाच्या झाडावर जाऊन बसला.

मध्यरात्रीच्या सुमारास ते भूत आणि त्याचे सहा हंडे तेथे आले. नेहमीप्रमाणे ते हंडे नाचू लागले. पण नाचता नाचता मध्येच थांबून म्हणाले, "महाराज, आज पुन्हा माणसाचा वास येतोय, तो म्हातारा लोभानं पुन्हा आला वाटतं?" भुतानं झाडावर पाहिलं आणि दोघांना खाली उतरण्यास सांगितलं. ते दोघे खाली आल्यावर भुतानं म्हाताऱ्यास विचारलं, "म्हातारेबाबा, आज पुन्हा का आलात तुम्ही?"

म्हाताऱ्यानं घडलेली सारी हकिगत सांगितली. ती ऐकून त्या भुताला कोतवालाचा राग आला. त्यानं त्या कोतवालाला दोन लाथा मारल्या आणि मग आपल्या हंड्यांना संकेत केला. त्याबरोबर ते हंडे चहूबाजूंनी त्या कोतवालावर आदळून त्याची कणिक तिंबू लागले. कोतवाल रडू लागला. ओरडू लागला. क्षमा मागू लागला. तेव्हा अखेर दया येऊन ते भूत हंड्यांना म्हणाले, "पुरे झालं आता. खूप शिक्षा केली या बदमाषाला." भुताच्या हुकुमावरून त्या हंड्यांनी कोतवालाला मारायचं थांबविलं. त्यानंतर ते भूत कोतवालाला म्हणालं, "हे बघ, यापुढं जर कधी या म्हाताऱ्याला त्रास दिलास तर आमच्याशी गाठ आहे. हे लक्षात ठेव. चल निघ आता येथून. आणि झाल्या गोष्टीची कुठं वाच्यता केलीस तर खबरदार!"

कोतवालानं नाक घासून भुताचं म्हणणं मान्य केलं आणि धूम ठोकली. त्या दिवसापासून तो कधी कोणाच्या वाटेला गेला नाही आणि म्हातारा म्हातारीही सुखाने राहू लागली.





# माह्या दैव माह्या साथ

निवेदक :
श्री. बि. वा. जोशी

एक व्हता राजा. आन् त्याले व्हती एक रानी. राजा-रानीले पोरी व्हत्या चार. पोरगा बरीक एकही नव्हता.

एक दिवस काय झालं. राजा-रानी महालात बसले व्हते

आन् त्यांच्या म्होरं त्या चार पोरीही बसल्या व्हत्या. राजानं मोठीले जवळ घेऊनशान तिच्या तोंडावर हात फिरवत म्हनाला, "पोरी तू कोनाच्या दैवानं खाते"? "तुझ्या दैवानं बा". मोठ्या पोरीनं सांगितलं. मंग राजानं दुसरीले इचारलं. तिनंही तेच सांगितलं. तिसरी बी तेच म्हनाली.

चौथी व्हती सर्वामधी लहान. पन मोठी शांत, शायनी. तिले काई विचारलं तर धीम्यानं मोठा इचार करून बोलायची.

राजानं तिलेही जवळ बोलावलं आन् इचारलं, "का व पोरी तू कोनाच्या दैवानं खाते?"

त्या लहानीनं घटकाभर इचार केला आन् धीम्यानं म्हनाली, "खरं सांगू बा! मी माझ्या दैवानं खाते."

राजाले लहानीचा तो बोल ऐकून मोठाच राग आला आन् तिले त्या रागाच्या भरात खाली ढगलून दिला, आन् रानीले म्हनाला, "पाह्यली पोट्टी कसी घमंडी हाये? कसी म्हनते मी माझ्या दैवानं खाते, पाह्यतो मी कसी हो आपल्या दैवानं खाते ती."

रानीले राजाचा राग माहीत व्हता. कोनाची कड घेऊनशान बोलायले गेलं तर राजाले ते काही खपत नव्हतं. पण ती पोरीची माय व्हती. तिले सगळ्या पोरी सारख्याच. तिनं लहानीले उचललं आन् आतमध्ये घेऊन गेली.

राजाले लहानीचा बोल भायच लागला. त्यानं खूप इचार केला की इची घमंड जिरायले काही तरी करायले पाह्यजे.

दिवस उगवत व्हता, मावळत व्हता, महिन्यापाठी महिने आन् वर्सापाठी वर्सं जात व्हती, पोरी हळूहळू मोठ्या झाल्या. पोरीयाच्या लग्नाचा सवाल राजापुढं उभा राहिला. पन त्याले काय कमी व्हता?

पहिल्या तिनी पोरीयाचे लगीन चांगले घरदार व सीरमंत जावई पाहूनशान लावून दिला. राहता राहली लहान. राजा तिच्या त्या

दिसचा शब्द अजून काई इसरला नव्हता. या पोरीची घमंड जिरवलीच पाहिजे म्हणून तिले मुद्दाम गावामधीच एका बऱ्हाड पोराले पाहून तिचा लगीन लावून दिला. आन् मनात म्हनाला, "आता पाह्यतो ते कोनाच्या दैवानं खाते ते."

पहिल्या तिनी पोरी सिरमंताच्या घरी पडल्या. त्याहिले का कमी, मोठ्या खुसीत राहू लागल्या. सासर माहेर त्याहिले सारखंच. एकीनं यावं. चार दिवस माहेरी राहावं, दुसरीनं यावं तिसरीनं यावं नाही त राजानं मुद्दाम मानूस पाठवून त्याहिले बोलावून घ्यावं, पन लहानीले काई गावातल्या गावात असूनशान त्यानं कधी तिले बोलावलं नाही की, ती आली नाही.

लहानीच्या घरी तिचा बऱ्हाड दादला, म्हातारा सासरा आन् ती. बस, तिघंच मानसं. सासरा म्हातारा कोठला काम नाई का धाम. नवरा बऱ्हाड. भेटला काम त भेटला नाईं त घरी बसून राह्याचा, की गावामधी हिंडायचा. लहानी घरचं काम आन् अंबील पानी करायची. मोठ्या कष्टानं कसं तरी त्याहीचं चाललं व्हतं. पन पोरगी मोठी सोसीक आन् तिची देवावर मोठी भक्ती.

सक्काळी उठली की, सडासारवन करून सूर्येनारायनाले हात जोडायची, मंग सासऱ्याचे पायी पडायची तवाच काम धंद्याले लागायची. कधी तिले काम भेटला त जाऊन चार पैसे मिळो दोन पैस मिळो आनून अंबिल घाटा करायची. समंद्याले देऊन मंग सोता खायची. देवाले राती हात जोडून झोपी जायची.

होता होता चार वर्सं होऊन गेली. राजा जावयासमेत साऱ्या पोरीयाले दरसाली दिवाळीत घरी आनायचा, पाच न् पाच दिवस दिवाळी साजरी करायचा. पन लहानीले एकाही साली काही घरी आनला नाही की, कधी त्यानं "ते जित्ती (जिवंत) की, मेली हाय" याची चौकशी पन केली नाय. लहानीच्या मायले खूप वाटे की, एकदा तरी पोरीले घरी आनावं पन राजाचा सोभाव तिले माहीत

व्हता. त्याचा पुढं तिचं काही चालेना. राजा तिलेच उलटा म्हने, "तुह्या लाडानंच पोरीले एव्हडी घमंड चढली. तिचा मुख मी कधी पाह्यनार नाही."

मोठया तिन्ही पोरीयाचे नवतीचे दिवस संपले. मंग एकेकीले समजू लागला की, आपापल्या नवऱ्याले दारूची सवय, जुव्वाबाजी आन् रांडाचेही घर पाह्येन्याची सवय लागली हाय, आन् काम धाम काही नाही. "अंदानी खाना-मैदाना लवना," बापाजीच्या येळचा व्हता नोव्हता तो हळूहळू अस्या गुणानं कोठवर पुरणार ? झाले. राजाचे ते तिन्ही जावई गरीब होऊ लागले. त्याहीनं मंग बायकोले मारझोड करायची, सासऱ्याकडं पाठवायचं आन् पैसे घेऊनशान यायले सांगायचं.

पहिले पहिले राजा पैसे देत गेला, पन हम्मेसा तोच धंदा तो तरी कोठवर इतक्या जावयाले पैसे पुरवणार ? एक पोरगी व्हती का तीन पोरी व्हत्या. पुढं राज्यामधी एकदोन वर्सं पीकपाणी पन झाला नाही. राजाही गरीब होत चालला.

इकडे लहानी हम्मेस देवाले म्हनायची, "देवा माह्या दैव माह्या साथ." "थ्या" (त्या) जल्मी काही पाप केला असंल नाही तर असाच महादेव पूंजला असंल म्हनूनशान दादला असा भेटला. पन माह्या पाठीराखा तूच. सासरा बुडगा (म्हातारा) व्हता, पन सून आल्यापासून थोडा सुधरला, पहिल्यासारखं आता हात भाजावं लागे नाही. बसल्या ठिकाणी खावाले मिळत व्हता. तवा कसाही गावातला काम पाहून पोटापुरता आता तो आनू लागला. सुनेलाही तो कधी हिसकवासक करत नव्हता. आपल्या पोटच्या पोरीसारखा पाह्ये. तिलेही तेव्हढाच आसरा.

लहानसी झोपडी पन लहानी कसी बेस ठेवायची. फाटकं असल पन ते नेटकं ठेवावं म्हनूनशान नवऱ्याचे, आपले आन् सासऱ्याचेही कपडे धुवून साफ ठेवायची. घरामधी चार दोन भांडीच

पन कसी चकास हंड्या खोबऱ्या चक्क. दोहीं येळा रोज देवाले हात जोडायची.. सासऱ्या नवऱ्याले खाऊ घातल्याविना कधी तोंडात घास ठेवायची नाही.

होता होता देवाले तिची दया आली. एक दिवस उगवला आन् लहानी भाकर तुकडा करून वनमजुरीले गेली. मावळतीले एकटी घराकडे यायले लागली. एका वावराच्या बांधीवर आली त तिच्या कानी आवाज आला "मी येऊ ? मी येऊ ? . . . . . . "

लहानीनं इकडे तिकडे पाह्यलं, कोनीत दिसत नाही. "जोख्खळ" (डबडबून) होऊन गेली होती.

पहिले तिले वाटलं सासऱ्याले सांगावं. नवऱ्याल त सांगून काही फायदा नव्हता. फिदीफिदी हासता आन् जपी जाता. तवा आपुनच पुन्हा पाहू असं मनाशी म्हनुनशान चूप बसली. दुसऱ्या दिसी पाह्यतो तो तेच आपलं, "मी येऊ ? मी येऊ ? . . ." तवा तिले वाटलं नक्की येथी काही भूत-खेत आहे.

राती तिनं सर्वाले जपू दिलं आन् अंधारातच देवाले हात जोडले. तसीच बसून राहिली. बसता बसता तिचा कवा डोळा लागला तिले माहीतच नाही. पन तिच्या सपनात एक देवी आली आन् म्हनाली, "काल-परवा मी तुले वावरात भेटली आन् मी येऊ मी येऊ म्हनलं पन तू काहीच बोली नाही. मी लक्षुमी व्हय. देव तुले पावला. आन् मले म्हनाला तू लहानीच्या येथी जा. बेचारीले बापानं एवढा मोठा राजा असूनशान तिले एका गरिबाच्या गळ्यात बांधली आन् भिकारी केली. का तर तिने बापाले म्हटलं "माह्या दैव माह्या साथ".

"तवा तू का कर" लक्षुमी पुढे म्हणाली "मी उद्या सांजेसरसी तुह्या घरी येईल. मी येऊ ? मी येऊ ? म्हनील त ये माय सुखानं नांद असं तू म्हन. म्हंजे मी गडगडत येईल. एका कोपऱ्यात आधीच एक गड्डा कर, सासऱ्याले सांगी ठेव. नवऱ्याले तवा कोठं जाऊ

देऊ नको. गडगडन्याचा आवाज ऐकला म्हणजे तुले हांडा दिसंल त्यात हिरे, मोती, आन् सोन्याचे दागिने राहील, त्याची दह्या-भातानं, हळद-कुंकू सीपून पूजा कर. मग तिथं गड्डयत नेऊन ठेव. जोडचानं हातपाय जोड. सासऱ्याच्या पाया पड. त्याच्या आसीरवाद घे. मंग तू पाह्यसील तुझा काळच पलटून जाईल. गरिबाची सरिमंत होसील."

देवीनं सांगितलं तसंच लहानीनं केलं. हळूहळू तिचे वाईट दिवस संपले. आन् तिनं चांगला वाडा बांधला. देवीच्या किरपेनं तिच्या नवऱ्याचा बह्याडपनाही गेला आन् चार लोकामधी त्याचा मान मरातब व्हायले लागला. सासरा म्हातारा व्हता. पन मोठा शायना आन् शांत. पहिल्यापासून सुनेवर पोरीपरमान पीर्त व्हती त्याची. आता तर काळच पालटला. तोबी चांगला राहायले लागला.

इकडे राजाले वाईट दिवस आले. त्या तिन्ही पोरीयाची गती पर इचारुच नका. पहिलीले नवऱ्यानं टाकून दिला, मधलीचा नवरा मेला. तिसरीच्या नवऱ्यानं दोन रांडा ठेवल्या. साऱ्या पोरी राज्याला घरी आल्या. पैसा आना तवा घरी या असं दोहींचे दादले त्याहिले नेहमी म्हनायचे आन् राजाची परस्थिती तर पार बिघडली. जवळ पैसा नाही. पीकपानी नाही, परपंच पडला मोठा. आता नोकर चाकर ठेवायचीबी ऐपत राह्यली नाही. सोता वावरामधी राबायची पाळी आली. रानीलेबी बराबर जानं पडला.

लहानीले राजाच्या समद्या गोष्टी कळत व्हत्या. तिनं इचार केला. बापानं जरी आपल्याले तवा रागारागानं गरिबाले देऊन असी गत केली तरी, किती झाला म्हणून काय झाला, तो माह्या "बा" हाय. त्याच्या पोटी जलम घेतला.

दिवाळी समोर आलीच व्हती. सासऱ्याले तिनं सांगितला "मामाजी, मले तुमाले काही सांगावाच हाय. अवंदाच्या दिवाळीले मी माझ्या बाले, मायले आन् तिघा बहिनीले आवतन देईन म्हंतो.

राहील बिचारे पाच दिवस मापल्या घरी. बाले गरिबी आली. बहिनीयाचा तो ताल झाला. ज्याच्या दैवानं जसं घडायचं तसं व्हतं. आपुन नाईका भोगली गरिबी पन देवाची किरपा झाली."

"अवो पन पोरी तुले नाही कोन म्हटलं? मी सोता जाऊनशान ओवतनं देतो. आने घेऊन येतो समद्याले मंग तर झाला?"

लहानीले भाय आनंद झाला. दिवाळी आली. तिनं वाले, माले आन् तिघाही बहिनीयाले वाजांत्री आनून न्हाऊ धुऊ घातलं. पाच न् पाच दिवस दिवाळी केली. सर्वाले अहेर केला.

राजानं लहानीचा संसार पाहिला. त्याले वाटलं, "लहानीनं म्हटला तेच खरं झाला. कोनी काही कोनाच्या दैवानं येत नाही. ज्याचं दैव त्याच्या संगं."

दिवाळी आली आन् निघूनशान गेली. राजा रानी आपल्या मोठ्या तिन्ही पोरी घेऊन निवून गेल्या. लहानीनं आता समदे एकाच ठिकाणी राहू म्हणून पाह्यलं, पन राजा तिले म्हनाला, "नाही पोरी ज्याचं दैव त्याच्या संगं, आमाले जाऊ दे, आमचा दैव आमच्या साथ. सुखानं संसार कर."

लहानीनं जसं सुखानं राज्य केलं. तसं तुम्ही करा.





# काळशिंग राजा

## निवेदिका : श्रीमती जानकीबाई पाटील

एक होता राजा. त्याला तीन मुलं. दोन आवडतीची. एक नावडतीचा. ह्या नावडतीच्या मुलाचं नाव काळशिंग. तर एक दिवस काय झालं की, राजाला स्वप्न पडलं. त्या स्वप्नात राजानं

चांदीच्या मुळ्या, सोन्याचे ढापे आणि मोत्यांचे घस असलेलं एक झाड पाहिलं. राजा ते बघून भुलला. दिवसा ढवळ्या असलं झाड बघायला पाहिजेच म्हणाला. त्यानं आपल्या राज्यात दवंडी पिटली. पैजेचा विडा ठेवला. म्हणाला कसा, "चांदीच्या मुळ्या, सोन्याचे ढापे आणिक मोत्यांचे घस असलेलं झाड कुणी आणून देईल त्याला निम्मं राज्य बक्षीस देईन."

झालं. गावोगाव ही बातमी गेली. साती बनं ओलांडून तिनं ज्याच्या त्याच्या जवळ ही गोष्ट केली. पण कोण धजेनाच. कुणाला काय युक्ती गवसेनाच. तशी आवडतीच्या दोन मुलांनी विचार केला. पैजेचा विडा जिकायचा बेत केला. दोघं मिळून निघाले. वाड्याबाहेर आले. कामगिरीवर निघाले. आवडतीकडून तहान-लाडू, भूकलाडू घेऊन चालले.

इतक्यात काळशिंग धावत आला. ह्या दोघांना हाक देत तो म्हणाला, "दादा दादा, थांब, मी पण येतो." तर हे दोघे म्हणाले, "तुझं काय काम? जा मागं तू." म्हणून मग हा माघारी गेला. त्याला वाईट वाटलं. "एकटा जाईन तर नावाचा!" असा त्यानं बेत केला. धावत धावत आईकडे गेला. झुणका भाकरी दे म्हणाला. नावडतीनं ते ऐकलं. लगोलग झुणका भाकरी बांधून दिली. काळशिंग ती घेऊन निघाला. त्यानं आवडतीच्या दोघांना पुन्हा वाटेत गाठलं. तशी त्या दोघांनी विचार केला, "आपण उत्तर दिशेला जाऊ या." आणिक मग त्यांनी काळशिंगला दक्षिण दिशेला जा म्हटलं. पण जायच्या आधी त्यांनी प्रत्येकाचा एकेक बाण त्या जागेवर ओळखीचा म्हणून मारून ठेवला. जो आधी येईल त्यानं आपला बाण घेऊन जावा असं ठरलं आणि मग सगळे आपापल्या वाटेनं निघून गेले.

जाता जाता आवडतीची मुलं गेली त्या वाटेत एक मोठं गाव लागलं. तिथं एक माणूस दवंडी पिटीत होता, "आमच्या राजाच्या मुलीनं एक पैज मारलीय. सोंगट्याच्या डावात तिला जो कुणी

हार खायला लावील त्याच्याशी ती लग्न करील. शिवाय त्याला अर्धे राज्य बक्षीस मिळेल." त्या मुलांनी हे ऐकलं. ते गावात गेले. त्यांनी राजवाड्यावर जाऊन पैजेचा विडा उचलला. दोघेही राजाच्या मुलीबरोबर सोंगट्या खेळायला बसले. पण त्यांना डाव जिंकता आला नाही. ते पैजेत हरले. त्या कारणानं राजानं त्यांना बंदिखान्यात पाठविलं.

इकडे तोवर काळशिंग बारा न् बारा चोवीस कोस वाट चालून गेला होता. दिवस बुडायची वेळ. आसपास चिटपाखरू पण नाही. दाट जंगल. किर्र्र झाडी. भयाण काळोख. पण काळशिंग घाबरला नाही. एके ठिकाणी रात्र झाली म्हणून बसून राहिला.

इतक्यात काय झालं की, एका झाडीत त्याला थोडासा जाळ दिसला. इथं कुणी तरी वस्ती करून राहिलंय अशी त्याला खात्री पटली. उजेडाच्या दिशेनं तो निघाला. हळूहळू चालला. तिथं जाऊन बघतोय तर कुणी नवराबायको जाळ करून शेकत बसलेले. हा त्यांच्याजवळ गेला. तशी त्यांनी त्याला विचारलं, "तू कोण? कुठला? कशाला आलास?" म्हणून काळशिंग म्हणाला, "मी एका राजाचा मुलगा. पण नावडतीचा. आमच्या राजाला चांदीच्या मुळचाचं, सोन्याच्या ढाप्याचं, न् मोत्यांच्या घसाचं झाड बघायचंय. ते कुठं गवसतंय का म्हणून बघायला निघालोय."

त्यावर तिथला माणूस म्हणाला कसा, "लई अबजूक गोष्ट हाय बाबा ही!"

आणि मग असं बराच वेळ इकडचं तिकडचं बोलत बोलत तिथंच सगळे झोपी गेले. पण मध्यरात्रीला नवरा जागा झाला. बायकोला म्हणाला, "अग अग, काय तरी उकड. पोरगं उपाशी तापाशी असेल." तशी तिनं काळशिंगची पिशवी चाचपली. बघतेय तर झुणका भाकरी. कधी न बघितलेला न खाल्लेला जिन्नस. तिनं तो चटकन बाहेर काढला. दोघांनी मिळून खाल्ला. त्यांना भाकरी आवडली.

तोंडाला चव आली. म्हणून मग दोघांनी विचार केला. काळशिग-साठी भात उकडला. अन् मग ते पुन्हा झोपी गेले.

काळशिग सकाळी उठला. जेवला खावला. मग ह्या नवरा-बायकोनी एक पिंजरा तयार केला. काळशिगच्या जवळ दिला. पण तो देताना ते म्हणाले, "इथनं बारा कोसांवर जा. एक भयंकर मोठी शिळा दिसेल. तिथं एक उंच झाड असेल. एक चांगली बाग दिसेल. तर तू तिथं जा. रात्री बाराच्या सुमाराला सावध आस. एक भला मोठा नाग येईल. तो आला रे आला की, त्याच्या फडीवर हा पिंजरा मार. एक जोराचा तडाखा भडकाव. त्याचे तुकडे होतील. शत्रू दिसला की पिंजरा पुढं कर. शत्रू मरून जाईल. तुझं काम होईल." काळशिगला आनंद झाला. त्या दोघांचा निरोप घेऊन तो तेथून निघाला. त्यांनी सांगितल्याबरहुकूम त्यानं सारं केलं. बारा कोसांवर जाऊन त्यानं नागाला ठार मारलं.

आणि मग तो तिथं दिसणाऱ्या एका भल्या मोठ्या वाड्याकडे गेला. तिथं त्या नागाची लेक रहात होती. तिला माणूस कसला तो माहीत नव्हता. तेव्हा काळशिगला बघून ती घाबरली आणि त्याच्यावर ओरडली. "अहो, अहो इथून निघून जा. तुम्हांला बघितलं तर माझा बाप खाऊन टाकील."

हे ऐकून काळशिग हसला. म्हणाला, "त्यानं मला खाऊन टाकायच्या आधी मीच त्याला खाऊन टाकलंय !" तशी ती पळत पळत बागेत गेली. खरं खोटं बघावं म्हणाली. बघतेय तर खरंच बाप मरून पडलेला ! रडत रडत बिचारी माघारी आली. तिनं त्याला विचारलं, "माझ्या बापाला का मारलंस ? आणि तू कोण ?"

त्यावर काळशिग म्हणाला, "मी एका राजाचा मुलगा. माझ्या बापाला चांदीच्या मुळयाचं, सोन्याच्या ढाप्याचं आणि मोत्यांच्या घसाचं झाड बघायचंय म्हणून मी आलोय ! . . .आणि त्यासाठीच मी तुझ्या बापाला मारलं"

"असंच आहे तर मग आता मी सांगते तसं कर."

"सांगशील ते करतो. पण तसलं झाड दाखव."

"दाखवते. असं बघ, मी नटून सजून नाचत नाचत येते. तू त्या तरवारीनं एका फटक्यात माझं डोकं उडव. रक्ताच्या चिळकांडीत तसलं झाड तुला दिसेल."

"आणि मग? . . . तू? . . . तू मरशील ते?" काळशिंग थोडा घाबरला. म्हणून मग ती म्हणाली, "अंहं! मी मरत नाही. हीच तरवार तू एकदम उलटी कर म्हणजे मी साजिवंत होईन."

काळशिंगानं तिनं सांगितलं तस्सं सगळं केलं. त्याला पाहिजे ते झाड दिसलं. तो आनंदला, हारखला. मग नागाची मुलगी त्याला आणखी म्हणाली, "येथून बारा कोसांवर जा. तिथं माझी बहीण असते. तिला ही चिठी दे. घेऊन ये तिला." तसा काळशिंग तिच्या म्हणण्याप्रमाणं गेला. बारा कोसांवरच्या तिच्या बहिणीला भेटला. त्या बहिणीनं याला आणखी बारा कोसांवर पाठवलं. तिथं तिची आणखी एक बहीण राहत होती. काळशिंग मग तिकडे पण गेला. ह्या दोघींना घेऊन पहिलीकडे आला.

त्यावेळी त्यांच्यापैकी जी थोरली होती ती काळशिंगला म्हणाली, "आता बापाला मारलंस तर आम्हा तिघींशी लग्न कर. आमचा पालनकर्ता हो." काळशिंगानं ते कबूल केलं. तिघींना घेऊन त्या वाटेतल्या नवरा बायकोकडे आला. त्या देखण्या पोरींना बघून तो माणूस काळशिंगला म्हणाला, "असल्या स्वरूपवान पोरींना बघून कुणी तरी वाटेत तुझा घात करील. तर त्या तिघींच्या तीन लवंगा करून देतो त्या घे आणि मी सांगतोय तो मंत्र म्हण की त्या जिवंत होतील. काळशिंग कबूल झाला. हा हा म्हणता त्या तिघींच्या झालेल्या लवंगा एका लहानग्या पेटीत घालून तो निघाला.

आणि आला तो थेट तिघा भावांनी बाण मारून ठेवले होते तिथं आला. तिथं येऊन बघतोय तर बाण जसेच्या तसे. ह्याच पहिल्यांदा आलेला. त्याने आपला बाण उचलला आणि भावांच्या शोधाला तो निघाला. वाटेत त्याला एक गाव लागलं. राजाच्या मुलीनं मारलेली पैज त्याच्या कानांवर आली. सोंगटयांच्या डावात तिला आपण सहज जिंकू म्हणाला. ह्यानं राजाकडे जाऊन पैजेचा विडा उचलला. राजाच्या लेकीला सोंगटयांचा डाव जिंकून हारवली. राजानं मोठ्या थाटानं त्याचं लग्न लावून दिलं. अर्धं राज्य बक्षीस दिलं. आणि कैदेत डांबलेल्या सगळयांना सोडून दिलं.

ह्या कैदेतल्या माणसांत काळशिंगचे भाऊ होते. ह्यानं त्यांना ओळखलं. पण त्यांना ह्याची ओळख पटली नाही. म्हणून मग ह्यानं ओळख दिली. कपडेलत्ते दिले. आणि मग ह्या तिघींच्या लवंगा मोडून त्या झाडाचा चमत्कार करून दाखवला! पुन्हा मंत्र म्हटला. पुन्हा तिघी लवंगा झाल्या.

काळशिंगानं मग ह्या राजासमोर ती करामत केली. मोत्यांचा घस तोड म्हणून राजाला आज्ञा केली. पण राजा जसा पुढं जाई तसा मोठा चमत्कार होई. ते झाड उंच उंच व्हायचं आणि काळशिंग जवळ आला की, जवळ जवळ यायचं! काळशिंगनं घसाला हात लावला तसा हा राजा हारखला. त्यानं उरलेलं राज्य पण त्याला देऊन टाकलं.

होता होता गंमत झाली. त्या तिघींच्या लवंगा करायचं काळशिंगला भान राहिलं नाही. तो तसाच दोघा भावांना व ह्या चौघींना घेऊन बापाकडे निघाला.

पण जाता जाता वाटेत थोरल्या भावाला तहान लागली. काळशिंगाला पाणी आण म्हणाला. काळशिंग पाणी आणावं म्हणून विहिरीवर गेला. तसा ह्या आवडतीच्या दोघांनी विचार

केला की, काळशिंगला विहिरीत ढकलून द्यावं आणि वरून तोडी टाकून मारून टाकावं. तर काळशिंगाला ठरल्याप्रमाणे ह्यांनी लगोलग विहिरीत ढकललं. वर तोडी फेकल्या. आणि तो मेला म्हणून सांगत माघारी आले. त्या चौघींना घेऊन राजाकडे निघाले. पुढं सांगावा दिला.

राजाला आनंद झाला. हत्ती, घोडे, पालख्या न् मेणे घेऊन राजा सामोरा आला. त्यानं ह्या दोघांना विचारलं, "सांगितलं काम केलं बाळांनो ?" तशी हे "हो" म्हणाले. पण राजानं करामत दाखवा म्हणून तगादा केला तरीही आज उद्याची चालढकल त्यांनी फार दिवस चालवली. करामत येतच नव्हती तर करतायत कुठले ?

झालं. ह्या चालढकलीत चांगले पंधरा दिवस लोटले. इकडे तोवर काळशिंग विहिरीच्या खबदाडात लपून बसला होता. तर होता होता काय झालं की, त्या वाटेनं वाणी लोक व्यापार करून निघाले होते. ते त्या विहिरीवर जेवण करावं म्हणून थांबले. त्यांनी जेवण केलं. आणि पाणी प्यायला आणावं म्हणून त्यांच्यापैकी दोघेजण विहिरीत उतरले. तशी काळशिंग काकुळतीनं बोलला, "अरे बाबा, मला वर काढा." पण हे ऐकून ह्यांची दातखिळीच बसली. भूतबित असेल या भीतीनं ते आरडत ओरडत तसेच बिनपाण्याचे माघारी आले. त्यांनी अशानं असं आहे म्हणून बाकी-च्यांना सांगितलं. तर त्यात एक मुडदार माणूस होता तो म्हणाला कसा, "बघूया तरी कोण आहे ते ?" आणि तो धिटाईने विहिरीत उतरला. तशी काळशिंग पुन्हा बोलला, "अरे बाबा मला वर काढ." ह्या माणसानं युक्ती काढली. एक बारडी विहिरीत सोडून म्हणाला, "ह्यातून वर ये." काळशिंग बारडीतून वर आला. त्याला बघून सगळेजण पोट धरधरून हसले व आपल्या वाटेला लागले.

काळशिंगानं भावांनी केलेला कावा ओळखला. बैराग्याचं रूप घेतलं. एका जंगलात निघून गेला.

नागाच्या मुलींना हे ठाऊक होतं. त्यांनी राजाला घडली गोष्ट साईनसंगीत सांगितली. आणि इच्छा प्रकट केली की, "आपल्या राज्यात जेवढे म्हणून गोसावी असतील तेवढ्यांना बोलवा. अन्नसत्र उघडा. बक्षीस द्या." राजानं तसं केलं. गोसाव्यांच्या झुंडीच्या झुंडी येऊ लागल्या.

राजानं प्रत्येक गोसाव्याला प्रश्न केला, "काळशिंग राजाची गोष्ट सांगशील का?" पण कुणी हुंकार भरला नाही. राजाची उत्सुकता वाढीला लागली.

इकडे काळशिंग जंगलातल्या एका शिळेवर बसला होता. त्या वाटेनं आठदहा गोसावी निघालेले. ह्याला बघून त्यांचा म्होरक्या म्हणाला "ये... गोसावड्या... भोजनाला चल. बसलायस काय एकटाच?" तशी हा म्हणाला, "नाही येत मी!"

"वा! नाही म्हणजे? येतोस की नाही, का घालू त्रिशूळ डोक्यात?"

जिवाला धोका येतोय हे बघताच काळशिंग उठला. त्यांच्या मागोमाग निघाला. वाड्यावर आला. जेवण झालं. बाकीचे निघून गेले. हा एकटाच राहिला. राजानं त्याला विचारलं, "काळशिंग राजाची गोष्ट सांगशील का?" तर हा म्हणाला, "हो. सांगतो." पण ह्यानं काय केलं की, चारदोन गोष्टी सांगाव्या आणि एकदम गप्प व्हावं? "पुढं येत नाही" म्हणावं! मग राजा चिडला. शिरच्छेद करायची त्यानं त्याला धमकी घातली! तशी मग ह्यानं होय नाही करीत झाली गोष्ट राजाच्या कानांवर घडली तशी घातली. आणि आपण स्वतःच काळशिंग राजा असल्याचं कबूल केलं.

त्या घटकेला नागाच्या तिघी मुली पुढं आल्या. त्यांनी ह्याच्या पायांवर लोळण घेतली. तशी हा म्हणाला, "साज शिणगार करून या." त्या लगोलग शिणगार करून आल्या. बापासमोर नाचत या

म्हणाला. त्या नाचत आल्या. ह्यानं एकदम त्या तिघींची डोकी तरवारीच्या एका फटक्यात उडविली! त्यासरशी रक्ताच्या चिळकांड्या उडाल्या. राजाला चांदीच्या मुळयाचं, सोन्याच्या ढाप्याचं न् मोत्यांच्या घसाचं झाड दिसलं! काळशिगानं राजाला घस तोड म्हटलं, राजा हारकून टुम्म झाला. बिगीनं पुढं गेला. पण झाड त्याच्या दर पावलागणिक वर वर निघालं! तशी मग काळशिग पुढं झाला. त्यानं तो घस तोडला. बापाच्या फेटयात खोवला. तरवार उलटी करून ह्या तिघींना साजिवंत केलं!

आपलं म्हणणं काळशिगानं खरं केलं म्हणून राजा त्याच्यावर खूष झाला. त्यानं आवडतीच्या दोघांना फाशीची सजा केली.

पण काळशिग आडवा झाला. म्हणाला, "तसं करू नका बाबा. तुमचं राज्य ह्यांनाच असू द्या. माझ्या बायकोच्या राज्यात मी मालक म्हणून जाईन."

राजाला अचंबा वाटला. पण काळशिग मग तिथं थांबलाच नाही. अंहं! आपली आई व चौघी बायका घेऊन जिंकलेल्या राज्यात आला. त्यानं मग सुखानं राज्य केलं.





# ढुढुमलला

**निवेदक : प्रा. सदाशिव माळी**

एक व्हता सल्ल्या. लाल लाल भडक. जाडापोटना. भलता वातरट नी खोडी. कदी गुपचूप बसानी सवय नही. खयासन्या वडांगी त्याले

खेवाले काई पुरेनात. हाई वडांग वरथीन त्या वडांगवर कूद. त्या वडांगवरथीन हाई वडांगवर कूद. हाऊ त्याना रोजना उद्येक. भटकाना त्याले कदी कटाया उना ते शप्पत !

एक दिन वडांगीसवर कुदता कुदता त्यानी शेपूटले मुडना काटा. शेपूट लागनी दुखाले. आते काय करान् ? आंगनी ते आग व्हवाले लागनी. तव्हय तो तसाज गावना न्हाईनीबाक ग्या. न्हाईनी घर जाईसनी त्यानी न्हाईले रामराम क्या.

सल्ल्यानी न्हाइले कन्हीसनी सांग्, "न्हाईदादा, न्हाईदादा, मनी शेपूट म्हान काटा मुडी गया. काढी देस का ?" न्हाईनी सांग्, "नही रे दादा ! काटा काढता काढता तुन्ही शेप तुटी गयी ते तू मनी नन्हानीज मांगसी. मी नही काढी देत काटा. जाय !"

सल्ल्या न्हाईन्या रावन्या कराले लागना. तो बोलना, "नही नही न्हाईदादा." आसे कदी नाही व्हनार. मी तुम्हनी नन्हानी बिलकूल नही मांगन्हार.

न्हाईले सल्ल्यानी दया ऊनी. त्यानी सल्ल्यानी शेप हातम्हान धरी नी तो बागीबागी काटा काढाले लागना. पन झाये काय ? काटा काढता काढता सल्ल्यानी शेप गई तुटी ! सल्ल्या जोरजोर

---

व्हता = होता. सल्ल्या = सरडा. जाडापोटना = मोठ्या पोटाचा. नी = आणि. वातरट = वात्रट. खोडी = खोड्या करणारा. कदी = कधी. खय = खळे. वडांग = काटेरी कुंपण. खे = खेळ. काई = काही. हाई = ही. वरथीन = वरून. रोजना = रोजचा. हाऊ = हा. उद्येक = उद्योग. कटाया = कंटाळा. उना = आला. कूद = उड्यामार. शेपूट = शेपटी. मुडना = मोडला. आंगनी = अंगाची. व्हवाले = होऊ लागली. तव्हय = त्यावेळी. न्हाई = न्हावी. कन्हीसनी = कण्हून. मनी = माझी. तुन्ही = तुझी. तुटीगयीते = तुटली तर. रावन्या = विनवणी. कराले लागना = करू लागला. आसे = असे. नही व्हनार = होणार नाही. तुम्हनी = तुमची. नन्हानी = नन्हाणी. नही मांगन्हार = मागणार नाही. हातम्हानं = हातात. बागीबागी = हळूहळू. काढाले लागना = काढू लागला. गई तुटी = गेली तुटून.

म्हान रडाले लागना. त्यानी म्हाईले सांग्, "तू मनी शेप तोडी टाकी. आते तुनी नऱ्हानीज दे नहीते मनी शेपज दे. तुन्ही नऱ्हानीज दे नहीते मनी शेपज भरीदे." म्हाई काई नऱ्हानी देना. तव्हय सल्ल्या जोरजोर म्हान आराया मारु लागना. मंग कटाईसनी म्हाईनी सल्ल्याले त्यानाफानी नऱ्हानी दी टाकी.

नऱ्हानी हातम्हान लेताज सल्ल्याले भलता हारीख झाया. तठेंग तो कुदत कुदत भाईर न्हिगना. जाता जाता त्याले दिखन् कुम्हारन घर. कुम्हार बिचारा मडका घडी ऱ्हायंता. सल्ल्यानी कुम्हारले देख् नी त्याले इचार, "कुम्हारदादा, कुम्हारदादा, मनी नऱ्हानी तुम्हना घर ठी द्या. मी फिरीसन येस. मंग लई जासू." कुम्हार बोलना, " नही रे भो ! मी नही जोखीम लेत. तुनी नऱ्हानी दवडी गई ते तू मन मडकज मांगसी " सल्ल्यानी कुम्हारन्या खूप रावन्या क्यात. तव्हय कुम्हार तयार व्हयना नी त्यानी सल्ल्यानी नऱ्हानी घरम्हान ठी दिधी.

सल्ल्या गावम्हाईन फिरी ऊना नी कुम्हारफाईन त्यानी नऱ्हानी मांगू लागना. कुम्हारनी घरम्हान सल्ल्यानी नऱ्हानी देखी. पन ती काई सापडेना. बिचारा कुम्हार घाबरीग्या. आपली नऱ्हानी दवडी गई हाई समजता बराबर सल्ल्या कुम्हारसे जोरजोरम्हान कज्या करू लागना.

---

रडाले लागना = रडू लागला. त्यानी = त्याने. तोडी टाकी = तोडून टाकली. भरी दे = भरून दे. देना = देत नव्हता. आराया = आरोळ्या. त्यानाफानी = त्याजजवळील. लेताज = घेताच. दी टाकी = देऊन टाकली. हारीख = आनंद. तठेंग = तेथून. न्हिगना = निघाला. दिखन् = दिसले. लेत = घेत. दवडी गईते = हरवली तर. ते = तर. मांगसी = मागणार. तयार व्हयना = तयार झाला. घरम्हान = घरात. ठी दिधी = ठेवून दिली. गावम्हाईन = गावातून. फिरी ऊन = फिरून आला. कुम्हारफाईन = कुंभारापासून. मांगू लागना = मागू लागला. देखी = पाहिली. हाई = हे. घाबरीग्या = घाबरला. दवडीगई = गहाळ झाली. कुम्हारसे = कुंभाराशी. कज्या = भांडण.

त्यानी कुम्हारले सांग् "मनी न्‍न्हानीज दे नहीते तुन मडकज दे. मनी नन्हानीज दे नहीते तुन मडकज दे!" कुम्हार कटाईग्या नी त्यानी आपल एक मडक सल्ल्याले दी टाक. सल्ल्यानी मडक लीघ नी तो डोलत डोलत रस्ताधरी चालू लागना. रस्ताधरी जाता जाता त्याले एक मानोस आपला तोंडम्हान म्हैस धोई न्हायेल दिखना. त्यानाफान भांड काई व्हत नही. म्हनीसनी तो तोंडम्हनज म्हैसन्या धारा काढी न्हायंता. ते देखीसनी सल्ल्या तठे थांबीग्या नी त्या मानोसले सांगू लागना, "आरे, म्हैसवालादादा, म्हैसवालादादा! तोंडम्हान कसाले म्हैस धोस! मन मडक से ना रिकाम्. कसाले इतली तसदी लेस?" म्हैसवालानी सांग्, "नहीरे दादा, धोताधोता तुन् मडक् फुटीगे ते तू मनाफाडून मनी म्हैसज मांगसी."

सल्ल्या बोलना, "नहीर भो! मी आसकस भलतज मांगसू का? मना मडकानी किंमत काय नी तुन्हा म्हैसनी किंमत काय? लोक हसथीन ना माले. मडक रिकामज से. तव्हय उपेग करीले. ते माले खावाले थोडं काम पडाव से?"

म्हैसवालाले सल्ल्यान् म्हनन् खरज वाटन्. सल्ल्याना मडका म्हान तो म्हैस धऊ लागना. म्हैस धोता धोता म्हैसनी मारी लात. झाय काय? मडकबी फुटीगे नी दुदबी सांडाईगे. सल्ल्या देखीज न्हायंता. मडक फुटावर तो म्हैसवालावर खूपज संतापना. तो म्हनाले लागना, "तू मन मडक बय जबरी म्हान फोड्. आते मन मडकज दे नहीते तुनी म्हैसज दे. तुन मडकज दे नहीते तुनी म्हैसज दे."

---

लीध = घेतलं. रस्ताधरी = रस्त्याने. त्याले = त्याला. मानोस = माणूस. तोंडम्हान = तोंडात. धोई न्हायेल दिखना = धूत असताना दिसला. त्यानाफान = त्यांच्याजवळ. काई व्हत नही = काही नव्हते. म्हैसन्या = म्हशीच्या. काढी न्हायंता = काढीत होता. से = आहे. ज = च. धऊ लागना = धार काढायला लागणे. बी = ही. सांडाईगे = सांडले गेले. देखीज न्हायंता = पहातच होता. फोड = फुटल्यावर.

म्हैसवाला व्हता भोयाभराडा ! सल्ल्या पडना कज्याखोर. - सरता-सेवट कटाईसनी त्यानी सल्ल्याले म्हैस दी टाकी.

सल्ल्या म्हैस लीसनी मान हालावत हालावत जाऊ लागना. चालता चालता त्याले एक तेलीना घाना दिसना. घाना चाली ऱ्हायंता. पन तेलीफान बैल काई व्हता नही. तऱ्हय तेलीनी बायको घाना व्हडी ऱ्हायंती. बाई घाना व्हडस, हाई सल्ल्याले काई बर वाटन नही. त्यानी म्हैस तेलीना घानानी जोडे हुबी करी आनि तो तेलीले बोलना, "तेलीदादा, तेलीदादा, हाईकाय भलतज करी ऱ्हायनात. तुम्हेन ते बायकोले घानाले जुपी टाक. तुम्हेन मानोस सेतस का हैवान सेतस ? तुम्हले काई दयामाया से का ?"

तेलीनी उत्तर दीध, "काय करवा दादा, मी गरीब मानोस. बैल लेवाले मनाफान पैसा नहीत. तऱ्हय मनी बायकोज जुपी घानाले !" सल्ल्यानी सांग्, "आरे भो ! मनी म्हैस लेना मंग, जूप घानाले. रिकामीज से ती."

तेली बोलना, "नकोरे भो ! तुम्ही म्हैसबीस मरी गईते तू मनी बायकोज मांगसी."

"नहीरे दादा ! आसी भलतीसलती मांगनी मी करसू का ? आनि करीते तू तुनी बायको दी दीसी का ?"

---

भोयाभराडा = भोळाभाबडा. दिसना = दिसला. चाली ऱ्हायंता = चालत होता. तेलीफान = तेल्याजवळ. व्हडी ऱ्हायंती = ओढत होती. व्हडस = ओढते. जोडे = जवळ. हुबी = उभी. हाईकाय = हे काय. करी ऱ्हायनात = करीत आहात. सेतस = आहात. हैवान = राक्षस. दीध = दिले. करवा = करावे. लेवाले = विकत घेण्यासाठी. मनाफान = माझ्याजवळ. लेना = घेना. जूप = जूंप. रिकामीज = रिकामीच. मरी गईते = मेली तर. मांगसी = मागणार. आसी = अशी. मांगनी = मागणी. करसू का ? = करीन का ? करीते = केली तर. दी दीसी का ? = देणार का ?

तेली नही नही करत व्हता तरीबी सल्ल्यानी म्हैस घानाले जुपीज. घाना फिराले लागना. तेलीले हारीखं झाया. सल्ल्याबी टाया टिपाले लागना. पन म्हैसले घाना व्हडानी कदी सवय नही. तिना डोयासले ऊनी आंधारी नी ती धड्‌दिसी जमीनवर पडनी. सल्ल्या दवडत दवडत तिनाजोडे ग्या. पन म्हैस कोटे जिवत व्हती ? झाय ! सल्ल्या ठनान बोंब मारू लागना. तेलीते घाबरीसनी थरथर कापाले लागना. सल्ल्यानी हुकूम करा.

"तेलीदादा, तेलीदादा, मनी म्हैसज दे नहीते तुनी बायकोज दे ! मनी म्हैसज दे नहीते तुनी बायकोज दे !"

सल्ल्या भलता तोंडाय. त्याले कटाईसनी तेलीनी त्यानी बायको सल्ल्याना ताबा म्हान दी टाकी.

तेलीनी बायको मिताबरोबर सल्ल्या तट्ट फुगीग्या. तिले लईसन तो चालना. रस्ताधरी चालता चालता रात झायी. गावमा एक चौक म्हान तमासा चाली न्हायंता. सल्ल्यानी देख ते तमासा काई रंगत नही. तमासावाला नुस्ता गया काढी न्हायनात. लोक ऐकी न्हायनात. काई डुलक्या दी न्हायनात. तो तमासा खरा पन तठे व्हतात सर्वा मानसेभाई ! नाचन्हारीनना पत्ता नही. नाचन्हारीन

---

नही नही करत व्हता = नाही नाही म्हणत होता. तरीबी = तरीही. जुपीज = जुंपलीच. टाया = टाळ्या. टिपाले लागना = वाजवू लागला. व्हडानी = ओढायची. तिना = तिच्या. डोयासले = डोळ्यांना. ऊनी = आली. आंधारी = अंधारी. पडनी = पडली. तिनाजोडे ग्या = तिच्याजवळ गेला. कोटे = कोठे. जिवत व्हती = जिवंत होती. झाय = झाले. कापाले लागना = कापू लागला. तोंडाय = तोंडाळ. ताबा म्हान = ताब्यात. दी टाकी = देऊन टाकली, दिली. मिताबरोबर = मिळाल्याबरोबर. फुगीग्या = फुगला, गर्व झाला. लईसन = घेऊन. चाली न्हायंता = चालू होता. गया = गळा. काढी न्हायनात = काढत होते. ऐकी न्हायनात = ऐकत होते. दी न्हायनात = देत होते. व्हतात = होते. सर्वा = सर्व. मानसेभाई = फक्त पुरुष.

बिना तमासा ? काई खर् नही. सल्ल्याल काई ते पसन् पड् नही. तो तेलीनी बायकोले लईसन तमासावालासनी जोडेग्या आनि बोलना, "वो तमासावाला भो ! आसाकसा तमासा से तुना ? नुस्ता आल्लाईसनी लावन्या काय म्हंतस ? हाई बाई ल्या नाचाले !"

तमासावाला बोलना, "नहीरे दादा, तुनी वायको म्हजारम्हान मरीगईते तू आम्हनी ढोलगीज मांगसी."

सल्ल्यानी उत्तर दीध, "आरे, एवढस् नाचा म्हान का बायका मरतीस ? ल्या हाई बायको नी करा तमासा सुरु !"

तमासा सुरु झाया. बाईले नाचानी कदी सवय नही. नाचता नाचता तिले ऊना चक्कर ! ती पडनी खाले. खालते पडताज गई मरी ! बाई मरताखेप तमासावालान तोंडन् थूक उडीगे. सल्ल्याले सदोदित भुकानी सवय. तो जोरजोरम्हान आराया माराले लागना.

तमासावालासले त्यानी सांग, "आते तुम्हनी ढोलगीज द्या नहीते मनी बायकोज द्या. तुम्हनी ढोलगीज द्या नहीते मनी बायकोज द्या."

तमासावाला घाबरीग्यात नी त्यासनी तव्हयज सल्ल्याले त्यासनाफानी ढोलगी दी दीधी.

ढोलगी गयाम्हान आडकाईसनी सल्ल्या गावम्हाईन न्हिगना. गावभाईर एक बल्ली व्हती. तठे तो ग्या नी जोरजोरम्हान ढोलगी

---

पड् नही = पडले नाही. लईसन = घेऊन. आसाकसा = असाकसा. आल्लाईसनी = ओरडून. म्हंतस = म्हणता. हाई = ही. ल्या = घ्या. म्हजारम्हान = मधेच. आम्हनी = आमची. तोंडन् = तोंडाचे. थूक उडीगे = पाणी पळाले. भुकानी = भुंकायची, ओरडण्याची. आराया = आरडाओरडा. मरतीस = मरतात. खाले = जमिनीवर. गई मरी = गेली मरून. आम्हनी = आमची. लावन्या = लावण्या. ढोलगी = ढोलकी. झाया = झाला. मरतीस = मरतात. तुम्हनी = तुमची. नहीते = नाहीतर. तव्हयज = तेव्हाच. त्यासनाफानी = त्यांच्याजवळील. दी दीधी = दिली. गयाम्हान = गळयात. आडकाईसनी = अडकावून. गावम्हाईन = गावातून. न्हिगना = निघाला. गावभाईर = गावाबाहेर. बल्ली = टेकडी. जोरजोरम्हान = जोरजोराने.

वाजू लागना. त्यानी एकथून एक भारी वस्तू जिकी लिंथ्यात, म्हनीसनी तो नाचालेज लागना.

ढोलगी जोरजोरम्हान वाजीसनी तो वजीवजी गान् म्हनाले लागना—

*ढु ढु म ला ला*
*न्हानीवर मडकज जिकू*
*ढु ढु म ला ला*
*मडकावर म्हैसज जिकी*
*ढु ढु म ला ला*
*म्हैसवर बायकोज जिकी*
*ढु ढु म ला ला*
*बायकोवर ढोलगीज जिकी*
*ढु ढु म ला ला*

सल्ल्यानी ढोलगी जोरम्हान वाजताज ढोलगी गई फुटी नी सल्ल्या ग्या पई ! त्याले एकथून एक चढाईत वस्तू जिकालेबी ये लागना नही नी त्या गमाडालेभी ये लागना नही.

त्यानी तुटेल शेप लईसनी सल्ल्या पहिलेंगसारका वडांगे वडांगे फिराले लागना !

मनी गोट गई सरी नी तुम्हन पोट गे भरी.

---

एकथून एक = एकापेक्षा एक. जिकी लिंथ्यात = जिंकल्या होत्या. म्हनीसनी = म्हणून. नाचालेज लागना = नाचायलाच लागला. वाजीसनी = वाजवून. वजीवजी = जोरात. गान् = गाणे. म्हनाले लागना = म्हणू लागला. जिकू = जिंकले. जिकी = जिंकली. गई फुटी = गेली फुटून. ग्या पई = पळून गेला. चढाईत = चढत्या श्रेणीच्या. जिकालेबी = जिंकायलाही. ये = वेळ. लागना नही = लागला नाही. गमाडालेभी = गमवायलाही. तुटेल = तुटलेली. पहिलेंगसारका = पहिल्यासारखाच. फिराले लागना = फिरू लागला. गोट = गोष्ट. गई सरी = संपली. तुम्हन् = तुमचे. पोट गे भरी = पोट भरले, तृप्त झाला.





# बुरखेवाला

निवेदिका : सौ. हव्वाबी खान

एका शहरात एक धनवान व्यापारी रहात होता. तो फार दयाळू व परोपकारी होता. तो दूरदूरच्या शहरांत जाऊन व्यापारधंदा करीत असे. त्याच्या मदतीला नोकरचाकर असल्यामुळे तो बिनधोक मनाला येईल तितका माल खरेदी करीत असे. त्याला एक मुलगा होता. तो असेल फार तर पाच सहा वर्षांचा. त्याचे गुण लहानपणीच दिसत होते. तो आईला कधीच त्रास द्यायचा नाही. आणि आईला लाडालाडाने म्हणायचा कसा, "आई आई मी की नाई दूलदूलच्या गावी जाऊन लई लई पैसे आनील आणि ते सर्व तुलाच देईन हं, मग आपण खूप खूप मजा कलू बल का ?" त्याचे हे बोलणे ऐकून आईला फार फार आनंद व्हायचा.

असेच अजून काही दिवस गेले. एके दिवशी व्यापारी खूप दूरच्या शहरी व्यापारासाठी गेला. आणि परत येताना बिचाऱ्याचे जहाज समुद्रात बुडाले. त्याबरोबर सर्व सामानसुमान नोकरचाकर बुडून मरण पावले. त्याचा एकुलता एक मुलगा विजयचंद्र उघडा पडला. घरात कोणी कर्ते नव्हते. जेव्हा ही खबर घरी पोचली तेव्हा त्याच्या बायकोला धक्काच बसला. घरात हिरेमोती, जडजवाहीर भरपूर होते. आणि तोच तिचा आधार. पण कमनशीब बिचारी. नवऱ्याकडील लोकांनी घरातील सर्व चीजवस्तू पसार केल्या. घर सर्व धुवून निघाले. ती उघडयावर पडली. थाटामाटात दिवस काढलेले, आता उपाशी रहावे लागेल. आपल्यावर वाईट दिवस आले. लोक बघून हसतील म्हणून एके दिवशी तिने विजयचंद्राला आपल्याबरोबर घेतले. कपडालत्ता घेतला. आणि हळूच घराबाहेर पडली. कुठे जायचे कसे जायचे तिचे तिलाच माहीत नव्हते. बिचारी दर कोस दर मुक्काम करीत चालली होती. कधी चालायचे माहीत नाही. कधी ऊनवारा माहीत नाही. चालता चालता तिच्या पायाला फोड आला. तिला चालवेना म्हणून ती एका झाडाखाली विसाव्यासाठी थांबली. संगं आणलेली शिळीपाकी भाकरी खाल्ली. विजयचंद्राला चार घास घातले आणि पाणी पिऊन तिथेच जरा कलंडली. तर तिला चांगली गार झोप लागली.

तिला त्यावेळी एक छान स्वप्न पडले. स्वप्नात शंकरपार्वती आले. त्यांनी तिला आशीर्वाद दिला आणि म्हणाले, "तू घाबरू नकोस विजयचंद्राला चांगलं सांभाळ. तोच तुझा मोठा आधार आहे. थोड्याच दिवसांत तो राजा होईल आणि मग तुझे कल्याण होईल." ती झोपेतून जागी झाली. तिला फार आनंद झाला. तिने देवाची करुणा भाकली. विजयचंद्राला झोपेतून जागं केलं. त्याचा गोड गोड पापा घेतला. आणि पुढे निघाली. चालता चालता त्यांना एक शहर लागलं. ती शहरात गेली, कामधंदा विचारू लागली. पण काम तरी काय मिळणार ? एका सावकाराच्या घरी घरकाम मिळालं. दोघा मायलेकरांना आधार झाला. विजयचंद्र आता शाळा शिकू लागला. त्याला चांगले शिक्षण मिळू लागले. थोड्याच दिवसांत तो चांगला तरबेज झाला. पण पुढे त्याचे लक्ष शाळेत लागेना, म्हणून एके दिवशी तो आईला म्हणाला, 'आई मी काही तरी व्यापारधंदा करतो.' आईला आनंद झाला. तिने विजयचंद्राला शंभर रुपये दिले. मग विजयचंद्राने आईचा आशीर्वाद घेतला आणि निघाला दरकोस दर मुक्काम करीत, तो एका खेडेगावी पोचला. त्या गावात शिरण्याच्या अगोदरच त्याला एक दृश्य दिसले. एका माणसाचे प्रेत दुसरा एक मनुष्य इकडून तिकडे व तिकडून इकडे ओढीत आहे. त्या माणसाची बायको व मुले रडत आहेत. विजयचंद्राने जवळ जाऊन चौकशी केल्यावर त्याला कळले की, त्या सावकाराचे पन्नास रुपये देणे आहे. ते मिळाल्याशिवाय तो प्रेत बायकोच्या व मुलांच्या ताब्यात देणार नाही. विजयचंद्राला फार वाईट वाटले. त्याने आपल्या जवळचे पन्नास रुपये त्या सावकाराला दिले. बाकीचे पन्नास रुपये मयत माणसाच्या बायकोला व मुलांना देऊन पुढची व्यवस्था करण्यास सांगितले. आता विजयचंद्राजवळ एकही पैसा उरला नव्हता.

विजयचंद्राला आता काळजी पडली. रिकाम्या हातांनी परत जायचे कसे ? आई काय म्हणेल ? म्हणून तो सटर फटर काम

करू लागला. पण त्यातही काही फायदा दिसून आला नाही. जेमतेम पोटापुरतेच मिळू लागले. त्याने बराच प्रयत्न केला. पण काही उपयोग होत नाही असे दिसल्यावर बिचारा विजयचंद्र नाइलाजास्तव परत फिरला. काही दिवसांनी घरी पोचला, आईला नमस्कार करून गप्प उभा राहिला. आईने विचारपूस केल्यावर त्याने आईला खरे खरे ते सर्व सांगितले. आईला राग येण्याऐवजी आनंद झाला. म्हणाली, " विजयचंद्र तू फार चांगली गोष्ट केलीस. तू केलेस ते योग्य असेच केलेस. तू काळजी करू नकोस. आता मी तुला भरपूर पैसे देऊन व्यापाराला पाठविते. तू आनंदात जा." पण विजयचंद्राला काळजी पडली हे पैसे येतील कोठून ? आपल्याला कोण देईल ? आईने विजयचंद्रासमोर आपल्या बिछान्यातील एक तकीया उसवून त्यातील भारी किंमतीचे हिरेमोती काढून दिले आणि म्हणाली, " बेटा विजयचंद्र, तुझ्या बापाची ही कमाई आहे." विजयचंद्राच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले, त्याला बापाची आठवण झाली. त्याने आईच्या पायांवर मस्तक ठेविले. आईचा आशीर्वाद घेतला. आणि पुढच्या तजविजीला लागला. थोड्याच दिवसांत तयारी पूर्ण केली. आणि तो व्यापारासाठी शहराबाहेर पडला. पण या वेळी तो एकटा नव्हता, दहा पंधराजण बरोबर होते. विजयचंद्र झपाट्याने मजल मारीत निघाला.

विजयचंद्र आता एका डोंगराजवळ पोचला होता. सूर्य मावळतीला चालला होता. डोंगर पार करणे शक्य नव्हते, म्हणून रात्री डोंगर पायथ्याशीच मुक्काम करण्याचे ठरविले. इतक्यात धुळीचे लोट त्यांच्या नजरेस पडले. सर्वांच्या नजरा तिकडे वळल्या आणि एक घोडेस्वार यांच्या काफिल्यात येऊन दाखल झाला. पण तो बुरखाधारी होता त्यामुळे तो कोण आहे हे ओळखणे शक्य नव्हते. त्याने विजयचंद्राला नमस्कार केला आणि म्हणाला, " तू कोण आहेस आणि कुठे निघालास ?" विजयचंद्र इमानी मुलगा ! त्याने सत्य तेच सांगितले. म्हणाला, " मी आईला एकुलता एक मुलगा. मी यापूर्वी

व्यापारधंद्यासाठी एकदा आलो होतो. पण परत जावे लागले." त्याने पैसे कसे दिले कोणाला दिले का दिले आणि परत का जावे लागले हे सर्व त्या बुरखाधारी माणसाला सांगितले, आणि म्हणाला, "मला अजून धंद्याची माहिती नाही." हे ऐकून बुरखाधारी म्हणाला, "दोस्ता तू काळजी करू नकोस. मी तुझ्या मदतीसाठी येतो. आपण दोघे भागीत धंदा करू." विजयचंद्राला काळजी पडली. हा नवखा माणूस, याचेजवळ पैसा नाही की, अडका नाही. आणि हा कोण आहे आणि कोण नाही. पण वेळ प्रसंग पाहून विजयचंद्राने संमती दिली. मग रात्री तिथेच मुक्काम केला. विजयचंद्राने चार चौघांना रात्री जागता पहारा करण्यास सांगितले. पण बुरखाधारी आडवा आला, "तो म्हणाला मित्रा हे काम माझे आहे. आपण भागीत व्यापार करतो ना, मग आजच्या रात्री मीच पहारा करतो." त्याच्या हट्टापुढे विजयचंद्राने हात टेकले. सगळेजण आपापल्या बिछान्यावर जाऊन झोपले, पण विजयचंद्राला मात्र झोप नव्हती.

ठीक मध्यान रात्री भले वीस पंचवीस चोर आले. आणि यांना लुटण्याचा प्रयत्न केला. पण त्या बुरखाधारी माणसाने चोरांना तंबूच्या आत येण्याच्या आधीच त्यांचा समाचार घेतला व सर्वांना यमसदनाला पाठविले. कोणीही जिवंत उरले नाही. मग बुरखाधारी निवांत झोपी गेला. हे सर्व विजयचंद्राने पाहिले, त्याने मनात देवाचे आभार मानले. सकाळ झाली चोरांच्या प्रेताचा ढीग पाहून सर्वजण चकित झाले. सर्वांनी त्याची वाहवा केली. मग सर्व सामानसुमान बांधून पुढे चालू लागले. पुढे त्यांना एक शहर लागले. तिथे त्यांनी जो माल विकला व खरेदी केला त्यात त्यांना भरपूर नफा मिळाला. मग तेथून ते पुढे निघाले. बुरखाधारी सारखा पुढे पुढे असायचा. तो कधी फारसे बोलत चालत नसे. कामापुरता फक्त बोलायचा. जाता जाता त्यांना भयंकर अरण्य लागले. जिकडे तिकडे झाडेच झाडे. तेथे एक पाटी लिहून ठेविली होती. त्यावर लिहिले होते की, "जवळच्या रस्त्याने जाऊ नये. धोका आहे. लांबच्या रस्त्याने

बिनधोक जावे." विजयचंद्राने सर्वांचा विचार घेतला. बुरखाधारी म्हणाला, "विजयचंद्र दूरच्या रस्त्याने जास्त दिवस लागतील त्यापेक्षा आपण जवळच्याच रस्त्याने जाऊ या." बुरखाधारीने मागे केलेल्या कामगिरीबद्दल सर्वांचा त्याच्यावर विश्वास होता. म्हणून सर्वांनी जवळच्याच रस्त्याने जायचे ठरविले.

पुढे पुढे बुरखाधारी व मागे मागे इतर काफिला चालू लागला. बरेच चालून गेल्यावर पुढे एक दरी लागली. ती चढण्यास फार अवघड होती. सूर्य मावळू लागला होता. म्हणून आजची रात्र इथेच काढण्याचे ठरले. सर्वांचे जेवणखाण झाले. विजयने नियमाप्रमाणे आपल्या साथीदारांना रात्री पहारा देण्यास सांगितले, पण आपला बुरखेवाला आहेच. तो म्हणाला, "आपण त्रास घेऊ नये हे काम माझे आहे. तुम्ही निर्धास्त झोपा." त्या सगळ्यांवर बुरखाधारीचा चांगलाच छाप बसला होता. त्यामुळे त्याच्यापुढे सहसा कोणाची बोलण्याची हिंमत होत नसे. सगळेजण थकल्या भागल्यामुळे पटापट झोपी गेले. बुरखाधारी जागता पहारा करीत होता. तो जरा विसाव्यासाठी जमिनीवर पडला तोच एक हाडळीण हळूहळू वास घेत घेत आली. तिचे लांब लांब हात होते. वीत वीत नखे वाढलेली होती. मोठमोठे डोळे होते. ती ज्या तंबूत शिरली नेमक्या त्याच तंबूत बुरखाधारी होता. हाडळणी ओठचाने हसली आणि बुरखाधारीच्या शेजारी असलेल्या खुर्चीवर बसली. तर काय गंमत झाली सांगू, ती एक सुंदर अशी तरुणी झाली. तिचे ते भयंकर रूप पार बदलले. मग बुरखाधारी हळूच उठून बसला आणि हसत हसत म्हणाला, "बरे झाले तू आलीस. हे बघ, आमच्याकडे किनई स्वयंपाकाला कोणीच बाई माणूस नाही." त्यावर ती म्हणाली, "मी येते ना तुमच्याबरोबर."

ती हाडळीण काय करीत होती माहीत आहे का ? त्या अरण्यातून जो जाईल त्याचे पोट फाडून फक्त काळीज खात होती. त्यामुळे त्या अरण्यातून कोणीच जिवंत जात नसे. म्हणून राजाने तो रस्ताच

बंद केला होता. पण बुरखाधारीच्या जादूमुळे सर्वांचा जीव वाचला. सकाळी सगळेजण सुखरूप उठले. त्या बाईला पाहून कोणालाच काही समजेना. त्या बुरखाधारीशी विचारण्याची हिंमत कोणी केली नाही. उलट सर्वांना त्याची भीतीच वाटू लागली. मग त्या बाईला घेऊन ते पुढे निघाले. पुढे मात्र त्यांना काहीच त्रास झाला नाही. चालता चालता त्यांना एक शहर लागले. तेथेही त्यांना भरपूर फायदा झाला. दोनचार दिवस तेथे राहून मग तेथून सर्वजण परत फिरले. बरेच दूर आल्यावर त्यांना एक सुंदर शहर लागले. पण यावेळी ते शहरात न जाता शहराबाहेर त्यांनी एका रमणीय ठिकाणी डेरा दिला. प्रत्येक मुक्कामी रात्री पहाऱ्यासाठी बुरखाधारी असायचाच. येथेही एक गंमत झाली. जिकडे तिकडे आता सामसूम झाली असेल नसेल तोच त्यांच्या तंबूपासून एक रेडा जाताना दिसला. त्याच्या पाठीवर एका तरुणाला कसून बांधले होते. हे बुरखाधारीने पाहिले आणि त्या रेड्याला अडवून त्या तरुणाची सुटका केली व विचारपूस करता कळले की, प्रत्येक आठादिसा एक माणूस व एक रेडा, मणभर भात, एक गुळाची ढेप पाठवावी लागते. कशासाठी माहीत आहे का ? तर तेथे एक राक्षशीण होती, तिच्यासाठी. अगर हे भोजन तिला मिळाले नाही तर ती शहरात येऊन भराभर माणसे खाऊन टाकी !

राजाने त्या राक्षशिणीला मारण्यासाठी पुष्कळ प्रयत्न केले. पण कोणालाही यश आले नाही. यावेळी राजाने फार मोठे बक्षीस देऊ केले होते. त्या राक्षशिणीला मारणाराला अर्धे राज्य व त्याच्याशी राजकन्येचा विवाह, त्यामुळे बऱ्याच लोकांचा प्रयत्न चालूच होता. पण भलत्याच माणसाला त्याचा लाभ झाला. म्हणतात ना नशिबातले कधी चुकत नाही. अगदी तसंच घडलं. त्या तरुणाऐवजी त्या रेड्यावर बुरखाधारी स्वत:च सवार झाला आणि चालला. थोडा दूर गेला असेल तोच एक महाभयंकर राक्षशीण उड्या मारीत नाचत नाचत आली. बुरखाधारीने क्षणाचाही विलंब न लावता

भराभर बंदुकीच्या गोळ्या झाडल्या. त्यासरशी राक्षशीण धाडकन् जमिनीवर कोसळली. आणि हातपाय आपटून आपटून मरण पावली. मग बुरखाधारीने तिचे दोन डोळे काढून घेतले व आपल्या पेटीत बंद करून ठेवले. सकाळ झाली. रेड्यावर बसून गेलेला तरुण घरी सुखरूप आला. सर्वांना आनंद झाला. थोड्या वेळाने राक्षशिणीला कोणी तरी मारल्याचा गाजावाजा झाला. बरेच जण पुढे झाले आणि मीच मारले अशा बढाया मारू लागले. पण त्या तरुणाने थोडक्यात हकिगत प्रधानाजवळ जाऊन सांगितली. त्यामुळे प्रधान स्वत: चौकशीसाठी यांच्या काफिल्याकडे आला. प्रधानाने बुरखाधारीशी चौकशी करता त्याने ठासून सांगितले की, "आमच्या राजकुमार विजयचंद्राने रात्री त्या राक्षशिणीला मारले." हे ऐकताच बिचाऱ्या विजयचंद्राचे धाबे दणाणले. मी त्या राक्षशिणीला पाहिलेदेखील नाही मग मारण्याचा प्रश्नच नाही. पण बुरखाधारीपुढे त्याचे काही चालेना.

प्रधान परत फिरला, राजदरबारात जाऊन राजाला ही बातमी दिली. राजकुमार विजयचंद्राला पाहण्यासाठी राजा अंबारीवर बसून आला. बुरखाधारीच्या शिकवण्यावरून विजयचंद्र पुढे झाला. राजाला नमस्कार केला आणि त्याने राक्षशीण कशी मारली ते सांगितले. व दोन डोळे काढून ते राजाला दाखविले. राजाला आता शंकाच उरली नव्हती. विजयचंद्राचे राजकुमारी पद्मावतीशी थाटात लग्न झाले. विजयचंद्राला अर्धे राज्य बक्षीस मिळाले. आता विजयचंद्र राजा झाला होता. त्याला आता काही कमी नव्हते. महिना दोन महिने येथे राहून मग राजा विजयचंद्र आपल्या आईच्या भेटीसाठी निघाला. बरोबर फौजफाटा होता. सर्व लवाजम्यासह काही दिवसांनी राजा विजयचंद्र आपल्या गावी पोचला. आईला खबर दिली. आई धावत आली. आपल्या लाडक्या मुलाचा एवढा थाट पाहून तिचा आनंद गगनात मावेना, तिचे स्वप्न खरे ठरले. पद्मावतीला पाहून तिच्या डोळ्यांतून आनंदाचे

अश्रू वाहू लागले. सर्व जिकडे तिकडे झाल्यावर बुरखाधारी विजयचंद्राला म्हणाला, "दोस्ता माझा वाटा देऊन टाक आणि मला परवानगी दे."

बुरखाधारीचे आपल्यावर किती उपकार आहेत हे राजा विजयचंद्र ओळखून होता. म्हणाला, "मित्रा तुला काय पाहिजे ते घेऊन जा. पण तुझी ओळख दे. तू कोण आहेस. तुझे गाव कोणते. तुझे नाव काय ?" बुरखाधारी म्हणाला, "तू मला विचारल्यावरून सांगतो. ज्याच्या मुलांबायकोवर तू उपकार केलेस, ज्या माणसाला तू कर्जातून मुक्त केलेस. तोच मी आहे." असे म्हणून तो काही एक मोबदला न घेता निघाला व दिसेनासा झाला. राजा विजयचंद्राला फार वाईट वाटले. त्याच्यामुळेच आज विजयचंद्र राजा झाला होता. आईलाही फार दुःख झाले. पुढे विजयचंद्राने त्या बुरखाधारी माणसाच्या बायकोला व मुलांना खूप मदत केली. राजा विजयचंद्र आपल्या आई व राणी पद्मावतीसह सुखात राज्य करू लागला. झालं.



# गार पडे ठक्का ठक्का

**निवेदक :**

**श्री. बाजीराव पाटील**



एक होता ठक. त्याले वाटे की आज आपुन कोनाले तरी ठकोयाले पाह्यजे. म्हनून त्यानं काय केलं, एका मळक्यात शेन भरलं अन् तोंडावर थोळंसक लोणी ठेवलं. मळकं डोकशावर घेतलं अन् बजारात गेला. दुसऱ्या गावात एक व्हता महाठक. त्यालेई वाटलं की लेक आज बजारचा दिवस हाये. एखांध्याले चक्कर देला पाह्यजे. मंग त्यानं लाकळाची तलवार केली अन् म्यानात घालून बजारात गेला.

"लोणी घ्या लोणी, पाठ्ठ्या म्हशीचं, आजच्या रईचं लोणी" ठक कलम्हा[1] करत जाये. महाठकाले वाटलं की हे शिकार चांगली हाये. लाकळाची तलवार लेकाच्या मस्तकी मारावं अन् मस्तपैकी लोणी घिऊन जावावं. पन सरक्या बोटानं थोळंच लोणी निघते ?

---

१ ओरड

मंग महाठक निघाला ओराया करत. पोलादाची तलवार घ्या, मोळतोळीच्या भावात असली तलवार घ्या. ठकाले वाटलं की हा म्हसोबा बरा हाये. शेनाचं मळकं याच्या गयात बांधावं अन असली तलवार घरी घिवून जावावं. ठकानं मंग त्याले हटकलं. काहो भाऊ, माह्या जोळचं लोणी विऊन तुमच्या जोळची तलवार देता काय? महाठकाले वाटलं की हे तर घरच्याच देवाचं निघालं. ठकानं तलवार घेतली. महाठकानं लोण्याचं मळकं[२] घेतलं. दोघंई आपल्या आपल्या गावात आले. ठकानं घरी आल्यावर तलवार म्यानातून उपसली. निऱ्हा लाकळाची व्हती. तो म्हने "लेक एवढा मी ठक असून लेकानं माहा लाकळाच्या तलवारीनं गया कापला." इकळे महाठकानं घरी आल्यावर लोण्याचं मळकं उलंडलं. खाली सबन शेनच निघालं. हा म्हने "एवढा मी महाठक असून लेकानं लोणी लावून माही शेंडी उपटली."

दुसऱ्या हप्ती दोघाईची आखीन बजारात भेट झाली.

"गळ्या, तू हायेस ठक अन् मी हाओ महाठक. आपुन दोघंझनं दुनिया ठकोयाले जाऊ." मंग दोघंझनं दरकोस दर मुक्काम करत करत एका गावात आले. एका बुढीच्या वटचावर ते निजले. बुढी चांगली शिरीमंत व्हती. तिले लेकरुबाय कोनीच नव्हतं. त्या दोघाईनं मंग इचार केला की बुढीच्या घरीच थोळे दिवस कामाच्या मिसानं राहू अन् एखांद्या दिवशी बुढीचं डबुलं रफुचक्कर करू. दुसऱ्या रोजी त्याहीनं बुढीले कामाचं इचारलं. बुढीनं ठकाले पानी भऱ्याचं काम दिलं अन् महाठकाले म्हैस चाऱ्याचं.

ठक पानी भरु भरु बेदम झाला पन रांजन काई भरेना. रांजनाले होतं छद्र. कायेळ रिचोली की छद्रातून पानी बाहीर येत जाये.

तिकळे महाठकाले म्हशीनं बेजार केलं. म्हैस अशी वांढाय की एका जागी चरेचना. ठकाचे पानी भरता भरता हात गेले अन् महा-

---

२ मडके

ठकाच्या म्हैस चारता चारता पायाले गोये आले. संध्याकायी भाकर खाल्ल्यावर दोघंझनं वट्यावर चिलम ओढत बसले. ठकानं मनात इचार केला की हे पानी ओढ्याचं काम महाठकाच्या बोळख्यावर टाकलं पाह्यजे. मंग त्यानं महाठकाले पानी देनं सुरू केलं. "आपली तर मजा झाली बोवा आज. वातच चार कायेळा पानी आनून रांजन भरला. अन् दिवसभर झोप घेतली."

"मंग असं करन गळ्या. मी सकाय पानी भरतो अन् तू म्हैस चाऱ्याले जाय."

"म्हशीमांगं जाऊन मी काहाले बेदम हुवू?" "अरे म्हैस अशी मस्त हाये. एकाच जागी चरत बसते. खुशाल आपुन झाडाखाळी आंग टाकून घ्यावं. मी त म्हनतो तू बाज अन् बिस्तरा घिऊनच जाय. खाली ढेकलं रुततात." महाठकानं सांगतल्यापरमानं दुसऱ्या रोजी ठक बाळबिस्तारा घिऊन म्हशीमांगं गेला. म्हैस काई एका जागी चरेना. त्यात डोकशावर बाजबिस्तरा घिऊन हिंडनं. संध्याकाय ठक थंडागार झाला. इकळे महाठक पानी आनू आनू घामाझोकील झाला. पन रांजन काई भरला नाई.

"काय लेका मले ठकोलं रे? चार कायेळात रांजन भरते म्हनस." महाठकानं म्हनलं, 'अन् तुह्या काय मले कमी ठकोलं? बाज अन् बिस्तरा डोकशावर घिऊन दिवसभर त्या डोबाळ मांगं हेलपाटे घेयाले लावले बोवा." ठकानं कुरकूर केली.

"आपुन एकमेकांले ठकोलं. पन आताया बुढीले ठकवा लागते." मंग दोघाईनं केला सल्ला, दुसऱ्या रोजी बुढीले सांगतलं, "आजी, या अवसले आपल्या गावात डाका पळनार हाये."

"मंग कसं करु बापा?"

"आम्ही सांगतो असं कर. तुह्या जोळचं अवघं सोनंनाणं एका रांजनात भरून ठेव. संध्याकायी आपुन तो रांजन घरामांगल्ल्या कोडच्या इहिरीत टाकून दिऊ."

बुढीनं कबूल केलं. संध्याकायी हे दोघंझनं घरी आले. बुढीनं रांजन भरून त्याच्यावर फळकं बांधून तयार ठेवला होता. मंग तो रांजन दोरानं बांधून कोडच्या इहिरीत सोळला. मंग त्याहिनं बुढीले सांगतलं की आता बिनघोर निजून राह्य. बुढी घरात निजली.

हे दोघं निम्मेराती उठले अन् इहिरीजोळ आले. इहिरीत दोर सोळला. ठक दोरानं इहिरीत उतरला. महाठक वधर राह्यला.

ठकानं रांजनाचं तोंड सोळलं. अंदर पाह्यलं त सोन्याचा पत्ता नव्हता. लोखंडाच्या कोपया, कुदया, कुशे असा सर्वा बारदाना व्हता. ठक म्हने बुढीनं लेक ठकोलं आपल्याले. इतल्यात बधरुन महाठकानं गरबळ करून लावली.

"रांजन पटकन दोराले बांध. मी वधर खयचून घेतो." ठकाले वाटलं की बुढीनं त ठकोलच ठकोलं पन आपल्याले महाठकानई ना ठकवावं? रांजन वधरच्या वधर घिऊन जाईल अन् आपल्याले इहिरीत पळू दिईल. म्हनून मंग ठकानं काय केलं की रांजन दोराले बांधला. त्यातला सर्वा लोखंडी बारदाना इहिरीत टाकला अन् आपुल्या रांजनात बसून रांजनाचं तोंड फळक्यानं बांधून टाकलं. महाठकानं रांजन वधर ओढला. रांजन डोकशावर घिऊन महाठक पयतच निंघाला. हासत जाये अन् मनात म्हने "ठकाले म्हना बस लेका इहिरीत बोंबलत. सबन सोनं एकटाच घेतो अन् जलमभर मजा करतो."

वधर रांजनातल्या रांजनात ठकई हासत जाये. दूर जंगलात गेल्यावर रांजन खाली ठेवला. रांजनावरचं फळकं काहाळ्ळं.

आतून सोनं त नाई पन ठकच हासत हासत बाहीर निघाला. महाठकाची चक[1] बसली ठकानं मंग त्याले सांगतलं की बुढीनंच आपल्याले कसं ठकोलं. रांजनात सोनं त नाई पन निऱ्हा लोखंडच कसं भरून ठेवलं होतं. "लेका मंग आंधी काबून नाई सांगतलं. मारे माह्या डोकशावर बसून डाव करत आला?" "मंग तुह्या कसा डाव केलतारे? मले इहिरीत देलं टाकून अन् निघाला होता एकटाच सोनं पचोयाले. मी ठक अन् तू महाठक आहो पन हे बुढी त सवाई ठक निघाली. आझून दुनियात कितीक एकापेक्षा एक ठक असतील. म्हनून आपलं गावच बरं." ठकानं म्हनलं, ते महाठकाले पटलं अन् दोघंई आपल्या गावात परतले.

---

१ चकित







# पैजेचा विडा

निवेदक : श्री. ग. ल. ठोकळ

एका गावात एक गरीब लोहार राहायचा. त्याचं नाव बलदेव. अंगापिंडानं तो लोखंडाच्या कांबीसारखा दणकट होता. त्याच्या बायकोचं नाव मृत्तिका, आणि मुलाचं नाव कुमार. तो आईबापांचा फार लाडका होता.

एक दिवस काय झालं की, बलदेवला जंगलातून फिरत असताना राजाच्या घरच्या दवंडीचा आवाज ऐकू आला.

"ऐका हो ऐकाऽऽ आपल्या या राज्याचे अधिपती पशुपतीमहाराज यांच्या राजवाड्याच्या पिछाडीला एक पडीत शेत आहे. हे शेत जो कोणी एका दिवसात नांगरील त्याला महाराजांचं अर्धे राज्य बक्षीस मिळेल होऽऽ आणि पैजेचा विडा उचलून जो हरेल त्याचं डोकं फोडलं जाईल होऽऽऽ."

बलदेवाला वाटलं, आपण ताकदवान आहोत. प्रयत्न करून पहावा, म्हणून दुसऱ्या दिवशी राजधानीच्या शहरात जाऊन त्यानं ते शेत पाहिलं. ते अगदीच लहान होतं. पण जमीन तव्याच्या पाठीसारखी कडक होती. बलदेवानं निश्चय केला. गावातल्या सुताराकडून त्यानं एक नांगर बनवून घेतला. लोखंडाचा एक दणकट फाळ तयार करून त्यानं तो स्वत: नांगराला बसवला. दोन धष्टपुष्ट बैल पैदा केले. त्याचा हा बेत मृत्तिकेला पसंत नव्हता. पण तिच्या विरोधाकडे त्यानं कानाडोळा केला. जाहीर केलेल्या दिवशी तो दरबारात गेला आणि त्यानं पैजेचा विडा उचलला.

आणि मग दुसऱ्याच दिवशी सकाळी त्यानं त्या शेतात नांगर घातला. पण घटकाभरातच नांगराचा फाळ तुटला व तो नांगर मोडून पडला. आता काय करायचं? बलदेव पैज हरला. राजाच्या मारेकऱ्यानं त्याच दिवशी त्याचं डोकं धडावेगळं केलं.

मृत्तिका धाय मोकलून रडली. पण तिनं बेत केला. तिनं गावातलं घर सोडलं. गावाबाहेर एक झोपडी बांधून ती तिथे रहायला गेली. कुमार अजून लहान होता. त्याला रोज दूध मिळावं म्हणून तिनं एक गाय घेतली. रोज सकाळी उठून जंगलात जावं, लाकूडफाटा तोडावा, त्याची मोळी बांधावी आणि ती गावात आणून विकावी असा उद्योग तिनं सुरू केला. गाईचं चारापाणी नेहमीच कुमार

करायचा म्हणून रोज रात्री झोपताना कुमारला जवळ घेऊन त्याची आई म्हणायची,

"बाळा, तू मोठा हो, बलदंड हो. आपल्या गाईला जे दोन गोऱ्हे होतील त्यांना आपण चांगलंचुगलं खायला घालून बळकट बनवू. पशुपतीमहाराजांचं काळीज उलटं आहे. तुझ्या बापाला त्यांनी हकनाक मारलं. त्याचा तो अघोरी पण अजून कोणी जिंकला नाही. तू बरीक तो जिंकावा असं मला वाटतं बघ. आपण सगळी तयारी करू." . . . .

असेच दिवस येत जात होते. कुमार मोठा होत होता. पण त्या गाईला गोऱ्हा काही होईना. मृत्तिका निराश झाली. एक दिवस मग ती कुमारला म्हणाली,

"बाळा आपलं नशीब फुटकं, आपली गाय भाकड निघाली. तू उद्या हिला जंगलात घेऊन जा आणि सोडून दे."

दुसऱ्या दिवशी कुमार गाईला घेऊन जंगलात गेला. एका झाडाच्या खोडाला त्यानं ती गाय दोरीनं बांधली. त्याचा त्या गाईवर जीव होता. तिच्या पाठीवर थाप मारून भरल्या डोळ्यांनी तिचा निरोप घेऊन तो परत फिरला. पण जंगलाच्या बाहेर पडताना त्याच्या कानांवर एक आवाज आला. एक मैना काटेरी झुडपात अडकली होती. ती ओरडत, चिरकत होती. कुमार तिच्याजवळ गेला. त्यानं तिला बाहेर काढलं. तिच्या अंगात काटे घुसले होते. एक पंख तर पारच फाटून गेला होता. कुमारनं तिच्या अंगातले काटे हलक्या हाताने काढले. जखमी मैनेला घेऊन तो घरी आला.

एका जुन्या टोपलीत कापूस पसरून त्यानं तिला निजवलं. तो रोज तिला खायला घालू लागला. पाणी पाजू लागला. काही दिवसांनी मैनेच्या जखमा बऱ्या झाल्या. ती झोपडीत हिंडू फिरू लागली. मधूनच गाऊ लागली. कुमार तिला कुरवाळी, तिचे लाड करी, तिचे पापे घेई. तिचा दुखावलेला पंख बरा झाला.

ती कुमारच्या अंगाखांद्यावर खेळू लागली. तिच्या पंखात ताकद भरली आणि मग एक दिवस ती भुर्रदिशी कुठं तरी उडून गेली. कुमारला वाईट वाटलं.

तो जंगलात जाऊन तिची वाट बघत बसला.

इकडे पशुपती राजानं या वर्षी नवीनच शक्कल लढवली. त्याला एकच मुलगी होती. एखाद्या परीप्रमाणं ती फार सुंदर होती. पशुपतीनं यंदा राजकन्येचं स्वयंवर मांडलं व पण लावला. जो कोणी पैज जिंकेल त्याला अर्धे राज्य तर मिळेलच पण राजकन्येशी त्याचं लग्नही होईल. ही दवंडी देत राजाचे सेवक गावोगाव हिंडू लागले.

होता होता एक दिवस लाकडांची एक भली मोठी मोळी बांधून कुमार जंगलातून घरी जायला निघाला. तेवढ्यात त्याच्या कानांवर त्या मैनेचा त्याच्या ओळखीचा आवाज आला. कुमारनं आनंदानं तिला हाक मारली. ती त्याच्या खांद्यावर येऊन बसली. कुमारनं प्रेमाने तिला पोटाशी धरली. तिचे पापे घेतले. तो तिला म्हणाला, "मैने, मैने, आता नको मला सोडून जाऊस. चल माझ्या घरी, मी नाही तुला सोडणार."

तेवढ्यात मैना त्याच्या हातून सुटली आणि एका फांदीवर जाऊन बसली. कुमार तिला धरायला धावला पण ती दूरदूर जात होती. कुमार तिचा पाठलाग करीत होता. ती पुढं न् हा मागं धावतच होते.

असं होता होता अंधार पडला. दिवस कधी बुडाला ते कुमारला कळलेच नाही. मैना एकदम दिसेनाशी झाली. मग तो भानावर आला. बघतो तर गुडूप अंधार. बाहेर कसं पडावं ते त्याला उमजेना. बराच वेळ तो चाचपडत भटकत राहिला.

शेवटी त्याला दूरवर प्रकाशाचा एक बारकासा झोत दिसला. त्या दिशेनं तो जात राहिला. जराशानं त्याला दिवा दिसला.

झाडांची दाटी विरळ झाली होती. मोकळ्या जागेत, एका झोपडीत तो दिवा जळत होता. त्याला हायसं वाटलं.

झोपडी समोरच्या अंगणात दोन बैल होते. विलक्षण धष्टपुष्ट. जवळच एक गाय होती. त्या मंद प्रकाशात कुमारनं तिला ओळखलं. ती त्याचीच गाय होती. तो पुढं सरकला. त्यानं तिच्या गळ्याला मिठी मारली. तेवढ्यात झोपडीतून एक म्हातारी बाहेर आली. तिच्या खांद्यावर त्याची मैना बसलेली होती. ह्याला बघून ती म्हातारी म्हणाली,

"माझ्या या मैनेला तूच वाचवलंस नाही का बाळ?"

"होय."

"तुझ्या उपकारांची फेड मी आधीच केली. तुझ्या गाईला मी वाचवलं."

" पण हे बैल ?"

" या बैलांना हिनंच जन्म दिला. बघ कसे हत्तीसारखे बैल आहेत हे."

"मला हे बैल हवे आहेत. नेऊ का मी ?"

" ने की. तुझेच आहेत हे. गाय बरीक राहू दे. मला तिचा फार ळळा लागला आहे. ही गाय अन् ही माझी मैना यांच्या जिवावर मी उरलेले दिवस काढीन. तू आज रात्री इथंच रहा. चल, मी तुला जेवायला वाढते."

कुमार जेवला. त्या रात्री तो तिथंच झोपला. सकाळी उठून बैलांना घेऊन तो परत फिरला. मृत्तिका काळजीनं हैराण झाली होती. कुमारला पाहून तिचा जीव वर आला. बैलांना पाहून तर तिचा आनंद गगनात मावेनासा झाला.

कुमारनं सांदीला पडलेला बापाचा भाता बाहेर काढला. ऐरण, हातोडा ही आयुधं सरसावून त्यानं भट्टी पेटवली. लोखंडाचे तुकडे जमवून त्यानं जोडणीला सुरुवात केली. मृत्तिकेनं लोखंड तापवून

लाल करावं आणि कुमारनं घणाचे घाव घालून त्याला आकार द्यावा. असा त्यांनी रात्रंदिवस कामाचा पिट्टा पाडला. थोडयाच दिवसांत संपूर्ण लोखंडाचा एक अजस्र नांगर तयार झाला, तो पाहून गाव-कऱ्यांनी अचंब्यानं तोंडात बोटं घातली.

इकडे तोवर पशुपती राजानं दरबार भरवला. राजा सिंहासनावर बसला होता. त्याच्या पुढ्यात चांदीचा चौरंग होता. चौरंगावर सोन्याचं तबक होतं. तबकात पैजेचा विडा ठेवलेला होता. राजानं नेहमीचं आव्हान दिलं. कुमार पुढं सरकला. त्यानं साधेच, पण स्वच्छ कपडे घातले होते. मुजरा करून तो म्हणाला,

"महाराज, हा पैजेचा विडा मी उचलतो."

"तू तर कोवळा दिसतोस. ही हिंमत करणाऱ्यांची आतापर्यंत काय दशा झाली ते तुला माहीत आहे ?"

"हो माहीत आहे. या शहराच्या वेशीवर आपण आतापर्यंतची डोकी लटकावली त्यातलं एक माझ्या बापाचं होतं."

"मला माहीत आहे. माझे हेर मला सगळ्या बातम्या अचूक देतात. तू त्या बलदेव लोहाराचा मुलगा नाहीस का ?"

"होय. माझ्या बापानं मारलेली पैज मी आज पुरी करणार आहे."

राजा खूप मोठ्यानं हसला व मारेकऱ्याला उद्देशून म्हणाला,

" येऽऽ तुझी तलवार तू तयार ठेव."

कुमार दुसऱ्या दिवशी पहाटेच उठला. त्यानं स्नान करून देवाचं दर्शन घेतलं. तो बैलांना घेऊन राजवाडयाच्या पिछाडीशी आला. मृत्तिका बरोबर होतीच. नांगराला बैल जोडून तो तयार झाला. शहरातले लोक त्या दिशेनं लोंढयांनी येत होते. भरजरी कपडे घातलेले पशुपतीमहाराज जागेवर येऊन हजर झाले. त्यांच्यासाठी व दरबारातल्या मानकऱ्यांसाठी एक प्रशस्त तंबू उभारला होता. त्यात लहानमोठी आसनं ओळीनं मांडून ठेवली होती. राजा उंच आसनावर

बसला. सरदारदरकरांनी तंबू गच्च भरला. लोकांची थाप गर्दी जमली होती.

उगवतीच्या डोंगरावर सूर्याच्या लाल गोळ्याची किनार दिसू लागली. राजानं खूण करताच येसकरानं तुतारी तोंडाशी नेली. गाल फुगवून त्यानं तुतारी फुंकली. कुमारनं बापाचं स्मरण करून हात जोडले. वाकून त्यानं आईच्या पायांना हात लावले. त्याला उठवून पोटाशी धरून मृत्तिका म्हणाली,

" बाळा, यशस्वी हो."

कुमारनं शेतात नांगर घातला. रेटा देऊन त्यानं त्या टणक जमिनीत नांगराचा फाळ खुपसला. बैलांनी हिसका देताच जमिनीचे कवच फुटले आणि ढेकळे बाहेर पडली. नांगरट सुरू झाली. बैल नांगर ओढीत होते. कुमार दोन्ही हातांनी जोर लावीत होता. जमीन फुटत होती.

बैलांना जोर चढला. ते धावत सुटले. एक सर पुरी झाली. कुमारनं नांगर फिरवला आणि बैलांना वळवले. दुसऱ्या सरीचं काम सुरू झालं. दिवस वर चढत होता. सरीमागून सरी संपत होत्या. लोक टाळ्या वाजवीत होते. मृत्तिका पापण्या न हलवता एकटक बघत होती. राजाची भिवई वर चढली होती.

दिवस डोक्यावर चढला. बैल धापा टाकीत होते. घामानं ओलेचिंब झाले होते. कुमारची घेरदार छाती भात्यासारखी फुसफुसत होती, अंगातून पाझरणाऱ्या घामाच्या धारा मातीत मुरत होत्या. त्याला तहान लागली होती. मृत्तिका पाण्याचा तांब्या घेऊन शेतात शिरली. राजा ओरडला,

"ओढा त्या थेरडीला मागं. पैजवाल्यानं पाणी प्यायचं नाही."

"पण महाराज, यापूर्वी आपण पाणी देत होतो." एकजण पुटपुटला.

"या खेपेस आमची परवानगी नाही." राजा गुरगुरला.

मृत्तिका मुकाट्यानं मागं सरकली. कुमारची नजर समोर रोखलेली होती. एक क्षणही वाया घालवायचा त्याची तयारी नव्हती. शेताचा अर्धा भाग नांगरून झाला होता.

दुपार उलटली. उन्हे उतरू लागली. लोकांना उत्साह चढला. टाळ्या पिटून व मोठमोठ्याने ओरडून ते कुमारला प्रोत्साहन देत होते. मृत्तिकेचा चेहरा आनंदाने फुलत होता. आता शेताचा थोडाच भाग शिल्लक उरला होता. यश टप्प्यात आलं होतं.

शेताच्या पलीकडच्या टोकाशी एक मुलगी उभी होती. ती सुंदर होती. तिच्या अंगावरले कपडे मळके व फाटके होते. केस पिंजारल्यासारखे दिसत होते. ती कुमारला म्हणाली,

"हे तरुणा, शाबास तुझी! मला तू फार आवडतोस. तुझं नाव काय?"

"चल, नीघ इथून, मला तुझ्याशी बोलायला वेळ नाही." कुमार तिच्या अंगावर खेकसला.

"नको बोलू, पण तुझ्यासाठी मी एक भेट आणली आहे. तिचा स्वीकार कर."

डोळे उचलून कुमारनं तिच्याकडे पाहिलं. तिचं लावण्य बघून तो चकित झाला. तिच्या हातात कमळाचं एक सुंदर फूल होतं. ते कुमारला देण्यासाठी तिनं हात पुढं केला. किती गोड मुलगी! किती सुंदर फूल! ती मुलगी गोड गोड हसली. त्यानं तिच्या हातातलं फूल घेतलं आणि ते आपल्या नाकाशी लावलं. त्याच क्षणी तो जमिनीवर कोसळला.

ती तरुणी विजेच्या चपळाईने निघून गेली. लोकांच्यामध्ये गडबड उडाली. कुमारची आई धावली. पहारेकऱ्यांनी तिला अडवून धरलं. ती छाती पिटीत रडू लागली. राजाचा चेहरा आनंदाने फुलला.

एवढ्यात एक मैना भुर्रदिशी आली आणि एका बैलाच्या वशिंडावर बसून आवाज करू लागली. तिथून लगेच उतरून ती कुमारच्या कपाळावर बसली. त्याच्या तोंडावर ती जोरजोराने चोच मारू लागली. इतक्या जोरानं की रक्ताच्या चिळकांड्या उडू लागल्या. कुमार चुळबूळ करू लागला. त्यानं डोळे उघडले. ताडकन् उठून तो उभा राहिला. मैनेला कुरवाळून त्यानं तिचा एक पापा घेतला आणि बैलांच्या शेपट्या पिरगाळल्या. दिवस मावळायला थोडाच अवधी होता. लोक दात खाऊन ओरडू लागले. बैल वाऱ्यासारखे पळू लागले. कुमार जिवापाड धावत सुटला. सूर्यदेव मावळायला आणि शेवटची सर पुरी व्हायला एकच गाठ पडली. मृत्तिकेने सुटकेचा नि:श्वास सोडला.

कुमारनं जमिनीवर अंग टाकलं आणि तो गप्प पडून राहिला. मृत्तिका धावत त्याच्याजवळ गेली. आपल्या कानशिलावर बोटे मोडून तिनं त्याची अलाबला घेतली. लोकांनी त्याचा जयजयकार केला.

दुसऱ्या दिवशी दरबार भरला. भरजरी वस्त्रे नेसलेली राजकन्या हातात कमळांची माळ घेऊन उभी होती. राजानं कुमारला पुढं येण्याची खूण केली. कुमारनं राजकन्येकडं पाहिलं आणि त्याला चटकन् ओळख पटली. आदल्या दिवशी त्याला कमळाचं फूल देणारीच होती ती ! दोघांची नजरभेट झाली. राजानं दोघांचं थाटात लगीन करून दिलं. सगळीकडे मग आनंदी आनंद झाला.



## निवेदिका : डॉ. सौ. सविता जाजोदिया

एक कोळी होता. तो रोज नदीवर मासे धरायचा आणि ते सारे राजाला नेऊन द्यायचा. त्यासाठी राजाकडून त्याला ठराविक पैसे आणि मासे धरण्यासाठी पीठ मिळत असे. होता होता तो कोळी म्हातारा झाला. मग आपल्या मुलाला बोलावून त्यानं आपलं मासे धरण्याचं जाळं त्याला दिलं आणि सांगितलं. "हे बघ, मी आता म्हातारा झालो. माझ्याने काही काम होत नाही. तुला मी या जाळ्यावर वाढविला. आता हे जाळं तू सांभाळ. रोज नदीवर मासे धरून राजाकडे नेऊन देत जा." कोळ्याचा मुलगा मोठा आज्ञाधारक होता. त्यानं ते जाळं घेतलं आणि वडिलांना म्हटलं. "बाबा तुम्ही मुळीच काळजी करू नका. मी मासे धरायचे काम चोख करीन."

दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे कोळ्याच्या मुलानं जाळं उचललं आणि मासे धरायला तो नदीवर गेला. जाळं पाण्यात टाकून तो थोडा वेळ बसला. आणि मग जाळं काढू लागला. तर काय आश्चर्य? जाळं काही केल्या बाहेर निघेचना, कोळ्याच्या मुलाला वाटलं आज भरपूर मासे जाळ्यात आलेले दिसतात. बाबांना काही एवढे मासे कधी मिळाले नाहीत. मला मात्र पहिल्याच दिवशी चांगला लाभ होणार असं दिसतं. त्यानं सारी ताकद पणाला लावून जाळं ओढलं. पण जाळं काही बाहेर निघेना. तशी कोळ्याचा मुलगा इकडे तिकडे पाहू लागला. तोच त्याच्या पाठीमागून आवाज आला, "निम्मे मासे मला देणार असशील तर मी तुला मदत करायला तयार आहे." मुलानं चमकून मागं पाहिलं. तर झाडावर एक स्त्री बसलेली दिसली. तिनंच मदत करायची तयारी दाखविली होती. कोळ्याच्या मुलाला निम्मे मासे देऊन टाकावेसे वाटेना. काही न बोलता त्यानं पुन्हा जोर लावला नि ते जाळं खेचलं. पण जाळं काही केल्या अजिबात हलेना. अखेर त्यानं त्या स्त्रीला निम्मे मासे देण्याचं कबूल केलं. तेव्हा

ती स्त्री झाडावरून म्हणाली, "आता तू जाळं ओढून बघ बरं." कोळ्याच्या मुलाला मोठं नवल वाटलं. त्याच्या मनात शंका आली की, ही बाई चेटकीण किंवा पिशाचीण तर नाही? तसं असलं तर ही रोज आपला छळ करील. म्हणून धैर्य करून त्यानं त्या स्त्रीला विचारलं, "बाई तू कोण आणि कुठची?" त्या स्त्रीने शांतपणे उत्तर दिले, "मी देवी आहे. तू रोज भल्या पहाटे सर्वांच्या अगोदर मासे धरायला येत जा. खूप मासे मिळतील. निम्मे मला दे, निम्मे तू घे." मुलाच्या जीवात जीव आला. त्यानं विचार केला ही देवी आहे होय? मग तिला रोज मासे द्यायला हरकत नाही. ही काही आपल्याला इजा करणार नाही. उलट आपलं भलंच करील. देवीला निम्मे मासे मोठ्या खुषीने देऊन कोळ्याचा मुलगा निघाला. राजाला रोज द्यावयाचे तेवढे मासे नेऊन दिले, आणि बाकीचे मासे बाजारात नेऊन विकून टाकले. अशा तऱ्हेनं त्याला दुप्पट पैसे मिळाले. कोळ्याचा मुलगा रोज असे करू लागला आणि थोड्याच दिवसांत त्याने शेकडो रुपये मिळविले.

देवीला माशांची चटक लागली होती. आणि कधी चुकून मासे धरायचे राहून जाऊ नये म्हणून ती रोज मध्यरात्रीच मुलाला जागे करून नदीवर घेऊन जात असे. एकदा कोळ्यानं विचार केला की, हा पोरगा रोज रात्रीचाच कुठे जातो? ते पाहिले पाहिजे. म्हणून तो रात्री जागत बसला. मध्यरात्री देवी आली तेव्हा कोळ्यानं पुढं होऊन तिला विचारलं, "तू कोण आहेस?" देवीने उत्तर दिलं, "मी देवी आहे. आणि मासे धरायला जाण्यासाठी तुझ्या मुलाला बोलवायला आले आहे." कोळी म्हणाला, "गेले बावन्न दिवस तू रोज याला मध्यरात्री घेऊन जात आहेस. अशाने याची झोप पुरी होत नाही आणि हा वेडा होऊन जाईल. आज काही मी याला जाऊ देणार नाही." देवी म्हणाली, "तुझा मुलगा बावन्न दिवस माझ्याबरोबर आला म्हणून मी याला बावन्न हत्तींइतके बळ दिले आहे. याला शंभर हत्तींचे बळ देण्याची माझी इच्छा आहे. तू याला माझ्याबरोबर

पाठव." पण कोळी काही मुलाला पाठवायला तयार होईना. अखेर निराश होऊन देवी निघून गेली.

सकाळी कोळ्याचा मुलगा नेहमीप्रमाणे नदीवर गेला. वाटेत त्याच्या मनात विचार आला. देवीनं मला बावन्न हत्तींचं बळ दिल्याचं सांगितलं ते खरं की खोटं हे पाहिलं पाहिजे. म्हणून जवळच असलेलं एक वडाचं झाड त्यानं जरासं हलवून पाहिलं. त्याच्या जराशा हलवण्यानं ते झाड जमिनीतून समूळ उपटूनच निघालं. कोळ्याच्या मुलाला आनंद झाला. आणि आंघोळीसाठी तो मुद्दामच हत्तीघाटावर गेला. त्या घाटावर रोज राजाचे हत्ती पाणी पिण्यासाठी येत असत. कोळ्याचा मुलगा त्या घाटावर बसून राहिला. थोड्या वेळात माहूत राजाचे हत्ती घेऊन आले. मुलाला घाटावर बसलेलं पाहून ते ओरडून त्याला म्हणाले, "अरे ए बाजूला हो नाही तर फुकट हत्तींच्या पायदळी तुडवला जाशील." पण कोळ्याच्या मुलानं माहुतांचं ऐकलं नाही. तेव्हा रागावून माहुतांनी हत्ती त्याच्यावर सोडले. पण कोळ्याच्या मुलाला तर देवीनं बळ दिलेलं होतं. त्यानं एका हत्तीची सोंड धरून माहुतासकट त्याला आकाशात दूर भिर-कावून दिलं. हत्ती आणि माहूत दोघेही पार कुठल्या कुठे फेकले गेले. पण मग मात्र हत्ती आणि माहूत फेकल्याबद्दल राजा शिक्षा करील असे वाटून कोळ्याचा मुलगा घाबरला आणि जंगलाकडे पळून गेला.

पळता पळता तो एका निर्जन जागी पोहोचला. तिथं त्याला एक राक्षस दिसला. एका मोठ्या झाडाच्या खोडाने तो आपले दात घासत बसलेला होता. कोळ्याच्या मुलानं धीटपणे त्याला विचारलं, तुझं नाव काय? त्याच्या धीटपणाचे कौतुक वाटून राक्षसानं उत्तर दिलं, "माझं नाव दंतबकर. मी राक्षस आहे. पण मी ऐकलं आहे की एक मनुष्य माझ्याहीपेक्षा बलवान आहे. त्यानं म्हणे राजाचे हत्ती आकाशात फेकून दिले. त्या हत्तींचा अद्याप पत्ता लागलेला नाही असे म्हणतात." कोळ्याच्या मुलानं म्हटलं, "मीच तो माणूस

आहे." दंतबकरला मोठा आनंद झाला. त्यानं कोळ्याच्या मुलाशी मैत्री केली आणि दोघे मिळून पुढे निघाले.

जाता जाता वाटेत त्यांना शेकडो गाड्या ओढून नेत असलेला राक्षस भेटला. कोळ्याच्या मुलाचा पराक्रम त्याच्याही कानांवर गेलेला होता. त्यानंही कोळ्याच्या मुलाशी आणि दंतबकरशी मैत्री केली. आता कोळ्याचा मुलगा, दंतबकर आणि गाडीवाला राक्षस असे तिघे मिळून पुढे चालले. वाटेत त्यांना एक अगडबंब राक्षस घोरत पडलेला आढळला. कोळ्याच्या मुलानं त्याचा केस उपटला पण राक्षस काही उठला नाही. दंतबकरनं एक भलं मोठं झाड त्याच्यावर आदळलं तरी त्याला काही लागलं नाही आणि गाडीवाल्या राक्षसानं गाड्या त्याच्यावर चालविल्या तरी तो काही चिरडला नाही. त्या तिघांपेक्षा तो जास्त बलवान होता. अखेर तिघांनी मिळून त्याला गदगदा हलविले तेव्हा डोळे चोळत तो उठून बसला आणि म्हणाला, "एका माणसानं हत्ती फेकून दिल्याचं मी ऐकलं त्यामुळं माझे हातपाय गळून गेले नि मला झोप लागली. आता सांगा बघू तुम्ही कोण आहात?" सर्वांनी आपण कोण ते सांगितलं. आपण मिळून मिसळून रहायचं ठरविलं असल्याचंही सांगितलं. ते ऐकून तो अगडबंब राक्षसही खूष झाला. तोदेखील या तिघांचा मित्र बनला.

आता चौघेजण बरोबरच निघाले. जाता जाता वाटेत त्यांना एक धर्मशाळा दिसली. ओसाड पडलेली होती ती, चौघांनी तिथं मुक्काम ठोकला आणि खाण्यापिण्याच्या व्यवस्थेला लागले. अगडबंब राक्षसाने दोघा राक्षसांना खांद्यावर बसविलं आणि तो नगराकडे निघाला. नगरीचे लोक तिघा राक्षसांना येताना पाहून घाबरले व सैरावैरा पळत सुटले. राक्षसांनी त्या सर्वांचं खाण्यापिण्याचं सामान उचललं आणि धर्मशाळेत आणून टाकलं. धर्मशाळेजवळच एक मोठा तलावदेखील होता. दंतबकरनं त्या तलावाचं पाणी आणलं. मोठमोठे वृक्ष उपटून चुलीत घातले.

लाकडावर लाकूड घासून चूल पेटविली आणि तो स्वयंपाक करायला बसला. तेवढा वेळ रिकामं बसून काय करायचं म्हणून बाकीचे तिघे फिरायला गेले. दंतबकरनं भाकऱ्या करून त्यांचा मोठा ढीग लावला. तेवढ्यात तिथं एक भला मोठा राक्षस आला. आल्याबरोबरच त्यानं दंतबकरला दरडावलं. "या सर्व भाकऱ्या बऱ्या बोलानं मला देऊन टाक. नाही तर माझ्याशी गाठ आहे." दंतबकर काही भाकऱ्या देईना. तेव्हा दोघांची कुस्ती जुंपली. दंतबकरपेक्षा तो राक्षस बलाढ्य होता. त्याच्यापुढं दंतबकरचा टिकाव लागला नाही. आणि तो राक्षस साऱ्या भाकऱ्या वगैरे घेऊन निघून गेला. दंतबकरला वाटलं, झाला प्रकार आपल्या मित्रांना कळला तर ते सर्व मला हसतील. म्हणून त्यानं घाईघाईनं पुन्हा सर्व स्वयंपाक केला. थोड्या वेळानं सर्वजण आले. इतर दोघा राक्षसांच्या नाही पण कोळ्याच्या मुलाच्या लक्षात आलं की, जाताना अंगण स्वच्छ होतं पण आता मात्र तिथं कोणी लढल्याचं दिसत होतं. पण तो काही बोलला नाही.

दुसऱ्या दिवशी गाडीवाला राक्षस स्वयंपाकाला राहिला. तिसऱ्या दिवशी अगडबंब राक्षस राहिला. पण त्या दोघांचीही दंतबकरसारखीच दशा झाली. चौथ्या दिवशी कोळ्याचा मुलगा स्वयंपाकाला राहिला. त्या दिवशीदेखील तो उपटसुंभ राक्षस आला आणि भाकऱ्या मागू लागला. ते ऐकताच कोळ्याच्या मुलानं चुलीतलं भलं मोठं जळकं लाकूड घेऊन त्या राक्षसाच्या डोक्यावर एवढ्या जोरात हाणलं की तो जागच्या जागी ठार झाला. तेवढ्यात तिघे मित्र माघारी आले. कोळ्याचा मुलगा त्यांना म्हणाला, "तुम्ही हे मला पहिल्या दिवशीच सांगितलं असतं तर तुम्हांला दोनदोनदा स्वयंपाक करावाच लागला नसता."

त्यानंतर कोळ्याच्या मुलानं म्हटलं, "हे पहा, मी आता पुढं जाणार. तुम्हांला माझ्याबरोबर यायचे असेल तर चला. नाही तर इथंच रहा." त्या तिघा राक्षसांनी तिथंच मुक्काम करायचं ठरविलं. तेव्हा कोळ्याच्या मुलानं त्या तिघांना एक फूल दिलं आणि म्हटलं,

"हे फूल कोमेजलं तर माझ्यावर काही संकट कोसळल्याचं समजून तुम्ही माझ्या मदतीला धावून या." त्या तिघा राक्षसांनी कोळ्याच्या मुलाला तसं वचन दिल्यावर तो पुढं निघाला.

पुढं गेल्यावर तो एका मोठ्या वाड्याशी आला. वाड्याभोवती छानदार बाग होती. आणि बागेत सोनेरी केसांची एक सुंदर मुलगी झोके घेत होती. तिनं हातानंच कोळ्याच्या मुलाला निघून जायला सांगितलं. पण कोळ्याचा मुलगा न घाबरता आत गेला आणि त्यानं सारी हकिगत विचारली तेव्हा ती मुलगी म्हणाली, "इथं राक्षसांचा सरदार आपल्या शंभर राक्षसांसह राहतो. मी राजकन्या आहे. माझे सोनेरी केस राक्षसांच्या सरदाराला फार आवडले म्हणून त्यानं मला पळवून आणलं आणि इथं डांबून ठेवलं. तो राक्षस आता येणारच आहे. तेव्हा तुम्ही इथून लांब पळून जा."

कोळ्याचा मुलगा म्हणाला, "एक सांग बघू, ते सर्व राक्षस एकदम आत येतात की, एकेकजण दारातून आत येतो?" राज-कन्येनं उत्तर दिलं, "मुख्य दरवाजातून एकेकजण आत येतो आणि सर्वांच्या शेवटी राक्षसांचा सरदार येतो." कोळ्याचा मुलगा म्हणाला, "मी दाराआड लपून बसतो. ते सर्वजण आत आले की, मी निघून जाईन तोपर्यंत कुणाला काही बोलू नकोस."

कोळ्याचा मुलगा दाराआड लपून बसला. पहिला राक्षस दारा-तून आत शिरताच कोळ्याच्या मुलानं त्याला उचललं आणि जमिनी-वर आपटून बाहेर फेकून दिलं. अशा तऱ्हेनं त्यानं सर्व राक्षसांना आणि त्यांच्या सरदाराला यमसदनाला धाडले. राजकन्येला मोठा आनंद झाला. आणि तिनं कोळ्याच्या मुलाशी लग्न केलं.

बागेपासून थोड्या अंतरावर एक नदी वहात होती. एके दिवशी राजकन्येनं नदीवर जाऊन स्नान केलं. त्या दिवशी तिनं आपले सोनेरी केस धुतले. पण काही केस न्हाताना तुटले. ते केस तिनं एका द्रोणात ठेवले आणि तो द्रोण नदीत सोडून दिला. वहात जाणारा तो द्रोण

शिकारीसाठी जंगलात आलेल्या एका राजपुत्राच्या दृष्टीस पडला. कुतूहलानं त्यानं तो द्रोण बाहेर काढला तेव्हा त्यास त्यात सोनेरी केस दिसले. त्यानं ओळखलं की हे केस एखाद्या राजकन्येचेच असले पाहिजेत. म्हणून आपल्या राज्यात परत आल्यावर त्यानं राजाला सांगून टाकलं की, "मी लग्न करीन तर या सोनेरी केसांच्या राजकन्येशीच करीन. तेव्हा राजाने महालातील सर्वांत चाणाक्ष अशा दासींना बोलावून तिला त्या राजकन्येचा शोध लावून घेऊन येण्यास सांगितलं.

ती दासी खरोखरीच मोठी चतुर होती. तिनं विचार केला. हा द्रोण ज्याअर्थी नदीतून आला आहे तेव्हा नदीकाठीच कुठे तरी ती राजकन्या असली पाहिजे. म्हणून तिनं एक नाव घेतली आणि बरोबर काही शिपाई घेऊन ती नावेतून ज्या बाजूस द्रोण वाहत आला होता त्या बाजूला निघाली. जाता जाता एक ओसाड जागी एक मोठा वाडा तिला दिसला. त्या वाड्यातच राजकन्या असली पाहिजे असा विचार करून दासीनं नाव तिथं थांबविली. खाली उतरून तिनं एक नगारा तिथंच झाडाआड लपवून ठेवला आणि शिपायांना म्हटलं, "तुम्ही इथंच लपून रहा. मी नगारा वाजवताच धावत येऊन राजकन्येला उचलून न्यायचं लक्षात ठेवा."

त्यानंतर दासी वाड्यात गेली. तेथे राजकन्येला पाहताच दासीने तिला जवळ घेतली आणि म्हटलं, "मी तुझी आत्या आहे." राजकन्येला ते खरंच वाटलं. आणि ती दासी तिथंच राहू लागली. थोड्याच दिवसांत राजकन्येचा तिच्यावर पूर्ण विश्वास बसला. कोळ्याच्या मुलालाही वाटलं की, राजकन्या एकटी राहते. तेव्हा आत्येची सोबत तिला मिळाली ते बरंच झालं.

एकदा दासीने गोड बोलून राजकन्येला म्हटलं, "महाराजांचे प्राण कशात आहेत ते विचारून ठेवायला हवं. कधी त्यांच्यावर काही संकट आलं तर आपल्याला कसं कळणार?" राजकन्या तिच्या

बोलण्याला फसली. तिनं कोळ्याच्या मुलाला त्याचे प्राण कशात आहेत ते विचारलं. कोळ्याच्या मुलानं थट्टा करण्यासाठी कोपऱ्यातील केरसुणी दाखवीत म्हटलं, "त्या केरसुणीत माझे प्राण आहेत." राजकन्येने आत्येला सांगितले की, "केरसुणीत महाराजांचं प्राण आहेत." दासीनं गुपचूप ती केरसुणी जाळून टाकली आणि त्या जागी दुसरी तशीच केरसुणी आणून ठेवली.

संध्याकाळी कोळ्याचा मुलगा परत आला. तेव्हा दासीनं ओळखलं की, त्यानं आपल्याला फसविलं. तिनं पुन्हा गोड गोड बोलून राजकन्येचं मन वळविलं आणि महाराजांचे प्राण कशात आहेत ते विचारून घेण्यास सांगितले. राजकन्या पुन्हा फसली आणि तिनं कोळ्याच्या मुलाला त्याचे प्राण कशात आहेत ते विचारले. यावेळी मात्र कोळ्याच्या मुलानं खरं सांगून टाकलं की, खोलीत जे फूल ठेवलेले आहे त्यात माझा प्राण आहे."

दुसऱ्या दिवशी कोळ्याचा मुलगा बाहेर जाताच दासीने राजकन्येला विचारलं, तेव्हा राजकन्येने त्याचे प्राण फुलात असल्याचे सांगून टाकले. दासीला काय हेच हवं होतं. तिनं राजकन्येला म्हटलं, "बाळ तू आंघोळीलाच नदीवर चल. मी तुझ्या पाठोपाठ तुझे कपडे घेऊन येतेच." राजकन्या रोजच नदीवर स्नानाला जात असे. म्हणून तिला कसलीच शंका आली नाही. ती पुढे गेली. मागून दासीनं ते फूल चुलीत टाकलं आणि नदीकाठी येऊन नगारा वाजविला. त्याबरोबर तेथे लपून बसलेले शिपाई बाहेर पडले आणि दासीच्या इशाऱ्यासरशी राजकन्येला बळजबरीनं नावेत घालून तेथून निघाले. राजकन्येला आता कुठं आपली फसवणूक झाल्याचं समजलं.

इकडे ते फूल आगीत पडताच कोळ्याच्या मुलाच्या अंगाची लाही लाही होऊ लागली आणि खाली कोसळून तो तळमळू लागला. तिकडे त्या तिघा राक्षसांनी फूल कोमेजून चाललेलं पाहिलं आणि आपल्या मित्रावर संकट आल्याचं ओळखून ते ताबडतोब त्याच्या शोधार्थ

बाहेर पडले. थोड्याच वेळात ते त्या वाड्यापाशी आले. तिथं त्यांना फूल आगीत पडल्याचं दिसलं. पण आग विझत आलेली होती म्हणून फूल पुरतं काही जळून गेलं नव्हतं. राक्षसांनी लगेच ते फूल आगीतून बाहेर काढलं आणि गार पाण्यात टाकलं. तिकडे कोळयाच्या मुलाच्या जीवात जीव आला. त्यानंतर त्या तिघा राक्षसांनी कोळयाच्या मुलाला शोधून काढलं आणि असं कसं घडलं ते विचारलं. कोळयाच्या मुलानं घडलेली हकिगत सांगितली आणि मग ते सर्वजण राजकन्येला शोधायला निघाले. तर त्यांना कळलं की, सोनेरी केसांची राजकन्या सापडली म्हणून त्या राज्यात आनंदी आनंद झालेला होता. सर्वत्र उत्सव साजरा केला जात होता. त्या चौघांनी चार मोठमोठे वृक्ष उपटून घेतले आणि रात्रीच्या वेळी नगरीच्या चार मुख्य प्रवेश-दारांवर जाऊन तेथे उभे राहिले. सकाळी लोकांनी त्यांना पाहिलं. तशी घाबरून सर्वांची बोबडीच वळली. राजाच्या कानांवर ही बातमी गेली तेव्हा राजा स्वतः त्यांना पाहण्यासाठी आला. राक्षसांनी दातओठ खात ओरडून राजाला म्हटलं, "राजकन्येला आमच्या हवाली कर नाही तर आमच्याशी गाठ आहे." राजानं राजपुत्राला बोलावून म्हटलं, "तुला सोनेरी केसांची ती राजकन्या हवी असल्यास, अगोदर या चौघांशी लढाई कर. नाही तर राजकन्या यांना देऊन टाक." राजपुत्रात त्या चौघांशी लढाई करण्याइतकं धाडस नव्हतं. त्यानं मुकाटयानं राजकन्येला त्या चौघांच्या स्वाधीन केलं.

कोळयाचा मुलगा राजकन्येला घेऊन आपल्या वाड्यात परत आला आणि ते तिघे राक्षस मित्राचा निरोप घेऊन पुन्हा त्या धर्मशाळेत येऊन राहू लागले. सगळीकडे मग आनंदी आनंद झाला.





# पुटाक्का

## निवेदिका : डॉ. सरोजिनी बाबर

असंच आपलं एक गाव होतं. तिथं एक म्हातारी रहायची. पदरी मूलबाळ असावं असं बोलायची. नवस बोलायची. देवाच्या नावानं घोकण्या घालायची. तर काय गंमत की, एक दिवस तिनं

देवाचा प्रसाद म्हणून मिळालेला मोठा नारळ एकलीनं खाल्ला. दिवसभर उगवल्यापासून मावळस्तोवर आपली खातच बसली. म्हणताना एक दिवस काय झालं की, स्वप्नात तिला एक साधूमहाराज दिसला. तशी हिनं आपली कुस उजूदे म्हटलं न् त्या साधूला तिनं लोटांगणही घातलं. तर मग साधूनं तिला सांगितलं की, तुला लेक होईल. त्यासरशी हिचा जीव हारखून गेला. 'चालंल' बोलली. मग त्या बाबानं तिला म्हटलं कसं, "पण तुझी लेक नखाएवढी लहान. गोरीगोरीपान जशी काय नेसलीय सूर्यबाण. लाखांत देखणी म्हण!" त्यावर ही आणखीनच हारखून जात 'असूंदे' म्हणाली. त्या बाबानं मग हिला घरला जा म्हटलं. भल्या पहाटेला दारीचा रांजण उपस म्हणून सांगितलं. त्यावेळी ही लेक भेटेल असं बोलला न् गेला निघून.

तर त्या भल्या पहाटेला उठून ही बघतीय दारात तर रांजण उसळचा मारतेला. अगबाई! ही हळूच पुढं गेली. मोगा घेतला न् लागली रांजण उपसायला. त्यासरशी त्या बाबानं म्हटल्यागत एक लाल चुटुक जिवणीची, नक्षत्राच्या रूपाची, अप्रुबाईच्या लावण्याची अशी नखाएवढी पोरगी एकदम रांजणाचा काठ चढून 'आई आई' करीत वर येतेली! म्हणताना हिनं हारखून जात त्या पोरीला म्हटलं, "आरं माज्या नशिवा! ये ये पुटाक्का. माजी काया तुज्यावनं ववाळून टाकते बयो, कित्तीग एवढीशी तु पुट्टी! नाजूक लुसलुशीत." आणि तिला आपल्या पोटासंगं धरली. हिला त्यावेळी एवढा आनंद झाला की, तिला बघून चांद सूर्या दिकुन खळखळून हसला ते! देवळातल्या नाजूक घंटेगत त्या पोरीच्या बोलण्यानं हिचं घर घुमलं तशी ही आपल्या लेकीला घेऊन 'पुटाक्का पुटाक्का' करीत घरभर फिरली तेव्हा कुठं हिचा जीव खाली पडला. "पुट्टी म्हणजे लहानगी न् पुटाक्का म्हणजे थोरली" अशी बडबड तिनं तोंड दुखोस्तोवर केली. पोटभर तिचे मुके घेतले. शंभरदा तिचा आलाबला घेतला. मऊ मऊ कापसाची गादी तिच्यासाठी हिनं केली. स्वत्ता कापूस नखाबोटांनी

पिंजला. चिटुकल्या गादीला पिटुकली उशी शिवली. खुतनीचा झोळणा फाडून त्याचं झबलं ह्या राणीला बेतलं. काचेच्या न्हाणीत तिला नेऊन न्हाणली. आकाटचा शेकाटचांनी पाळणा लांबवला. पुटाक्काला मग हिनं कापसाच्या बोळचानं दूध पाजलं. काजळ तीट केली न् मग गीतं गात निजवावं म्हणाली.

गुंजावणी डोळचांची, चाफेकळी नाकाची, गुलाबी गालाची, नाजूक टोकदार जीवणीची न् चिटुकल्या मिटुकल्या अंगलटीची ही लेक बघून म्हातारीला अस्मान ठेंगणं झालंवतं. तशात ती निजल्यावर मधेच खुदकिनी हसलेली बघून तर म्हातारीनं आपली काया तिच्यावरून ओवाळूनच टाकली.

होता होता मग ह्या मायलेकी झोपून गेल्या. कौलारू घराच्या छपरातून मग हळूच सूर्यदेव डोकावले. त्यांनी पुटाक्काचं रूप आणखीनच देखणं करून टाकलं.

तेवढचात तिथल्या पिंजऱ्यातल्या पोपटानं पुटाक्काला बघितली न् खाडदिशी पिंजऱ्याचं दार फोडून तो बाहेर आला. पण इकडचा आवाज तिकडे गेला नाही. अंहं! मग त्यानं म्हातारीनं बांधलेल्या पाळण्याची दोरी आपल्या चोचीनं हळूच तोडली न् ती आपल्या चोचीत घट्ट धरून तो त्या घराबाहेर पडला. उंच आभाळात उडाला न् एका झुपकेदार झपाळचा झाडावर त्या पाळण्यासह येऊन बसला.

तर काय गंमत की, तेवढचात ह्या पोरीला जाग आली. तिनं आपले डोळे उघडले. बघतेय तर समोर एक फार सुंदर पोपट. तिनं त्याला पाहिलं मात्र न् बोलली कशी, "लाल चुटूक ओठ. हिरवंगार अंग, तू मला देशील एक गोष्ट?" तशी ह्यानं 'हो' म्हणत मान हलवली. काय पाहिजे म्हणाला. त्यानं मग हिला उचलून अलगद अशी एका पानावर ठेवली न् डाळिंबाचे दाणे, पेरवाचे तुकडे खायला दिले. तर ते खात ही म्हणाली, "माझा दादा होशील का? मला नीट सांभाळशील तू? . . . आणि ती आई? ती कुठं गेली?"

"आई घरात निजलीय. आपण खेळूया. मी तुझा दादा. तू माझी ताई." पोपट बोलला. त्यानं गीतं म्हटली. त्याच्या आवाजानं सारी हवा गुंगून गेली. हवेतून गोड गोड आवाज घुमला. त्यात हिनं भर घातली. आपण पण गाणी म्हणाली. तशी नदी, डोंगर, नाले, खडक, आभाळ, धरणी अशा सगळ्याच ठिकाणांहून संगीत निघालं. ऐकणाराचं भान हरपून गेलं. झाडालादेखील वाचा फुटली तर ! खरंच ! गातं झाड नाचायला लागलं. पानं फांद्या हसायला लागल्या. पुटाक्काला खूप खूप गंमत वाटली. ह्या पानावरून त्या पानावर लोळण फुगडी खेळत तिनं पोटभर हेंदकळून घेतलं. पोपटाबरोबर खेळून खेळून दमली. त्यानं खायला दिलेलं खाऊन मग ती एका पानावर निजली. पोपटाचाही घटकाभर डोळा लागला. झाडानंही मग डुलकी काढावी म्हटलं. हातपाय पसरून दिले.

त्या धांदलीत मग काय गंमत झाली की, पुटाक्का ज्या पानावर निजलीवती ते पान गेलं अवचितच घरंगळून आणि ते नेमकं टपकलं ते एका लहानग्या नदीच्या घोळात. त्यासरशी त्या नदीचं पाणी उसळून वर उडालं न् ही पार भिजून गेली. "अगबाई ! काय झालं ? दादाऽऽ आईऽऽ"नाकातोंडात पाणी गेलेली पुटाक्का किंचाळली. म्हणताना तिच्या त्या गोड आवाजानं नदीकाठ भुलून गेला न् एका बेडकानं वर मान काढीत डरॉव डरॉव केलं. तर त्या आवाजानं ही दचकली न् घाबरून गेली. लागली रडायला. तशी बेडकानं काय आहे ते बघावं म्हणून पाण्यातून तो वर आला. बघतोय तर ही सुंदर मुलगी. त्यानं हिला पाहिली मात्र न् करीन तर हिच्याशीच लगीन करीन म्हणाला. त्यासरशी ही गेली हादरून न् बसली गपकिनी डोळे मिटून. . .नदीतून ते पान चाललवतं तर ही पण तरंगतच निघालेली. . .

पण बेडकाला कुठला आलाय दम निघायला.? त्यानं ते पान खस्‌दिशी ओढलं न् हिला फरफटत नेली एका बिळात. तिथला चिखल न अंधार बघून ही गेली पारच हादरून. आणि ह्याचं ते

ध्यान बघून तर तिचा जीव आणखीनच उडून गेला. बसली आपल्या आईच्या न् दादाच्या नावानं घोकण्या घालीत. पण तिथं कोण यायला बसलंय? सगळीकडं गारीगार न् अंधार. बिचारी गेली काकडून.

तेवढ्यात बेडूक बाहेर काही आणावे म्हणून गेला. मग हिला बरं वाटलं. हळूहळू चालावं न् कुठून तरी बाहेर निघावं म्हटली न् उठली. पण जाणार कुठं? तिने आपले डोळे मोठे केले. तशी तिला समोर एक परी दिसली. तिने मग हात देऊन हिला त्या चिखलातून बाहेर ओढली. न् आपल्या घरी नेली. मग हिला एकदम हायसं वाटलं. त्या ओबडधोबड बेडकाच्या तडाख्यातून सुटल्याचा आनंद तिनं त्या परीजवळ शंभरदा बोलून दाखवला. परीनं मग तिला जवळ घेऊन थोपटली. तिचा मुका घेतला. तिला जरतारी पोशाख घातला. न्हाऊमाकु घातलं, काजळ तीट केली आणि खेळ जा म्हणून तिच्या पुढ्यात रत्नांचे सागरगोटे, माणकांचे हत्तीघोडे आणि चांदण्यांची झाडं खेळायला टाकली. मग ही हारखून गेली. पिटुकल्या मिटुकल्या हातांनी खेळायला बसली. तशी हिला एकदम त्या पोपटदादाची आठवण आली. तिनं दादाऽऽ दादाऽऽ केलं. तर ती परी कशी म्हणते, "हा कुणाचा कोण दादा?" हिनं मग अशानं असं आहे म्हटलं. त्यासरशी परीचा चेहरा काळवंडून गेला. म्हणाली, "त्याच्या वाटेला नको जाऊस. वाईट्ट आहे." पण हिनं ते ऐकलं नाही. म्हणाली, "खोटं! माझा दादा फार चांगला आहे. राजाच्या लेकापेक्षा देखणा. बघितलायस का तू कधी?"

त्यावर ती परी गप्प राहिली. तिनं हिच्या पुढ्यातला तो खेळ घालवून टाकला आणि बागेत खेळायला जा म्हटलं. हिला काय? जा म्हणायचा अवकाश. लगेच गेली लुटूलुटू पळत. तर तिथं एक माळी बसलावता. त्याच्या हातात फुलांचं गुंफलेलं वस्त्र. भोवती फुलांचा ढिगारा. वास तर असा सुटलेला की बास. हिचं मन त्या वस्त्रात एवढं गुंतलं एवढं गुंतलं की, तिनं त्या माळ्याला विचारलं,

"कुणासाठी हे?" तशी त्यानं तिला सांगितलं, "त्या परीसाठी." मग ही आपल्याला पण एक तसलं गुंफून दे म्हणाली. तर माळ्यानं ते जमायचं नाही म्हटलं. फुलंच नाहीत म्हटला. आता फुलं संपली बोलला. तशी ही हुंदक्यानं दाटली न् गडागडा लोळायला लागली. त्यासरशी त्या जागेवरचं एक फूल तिला म्हणतं कसं, "मला गदागदा हालव. मग काय होतंय बघ" तर तिनं लगेच तसं केलं न् काय सांगावं देवा! तिथं सुवासिक फुलांचा एवढा भडिमार झाला की, त्या दरवळीनं ती परी धावत तिथं आली. तिनं भराभर ती फुलं उचलली न् गेली निघून. मग ही पुन्हा लोळली तर पुन्हा तेच घडलं. पुन्हा त्या परीनं सगळी फुलं पळवून नेली.

तेवढ्यात एक उंदीर तिकडून आला. हिचं रूप बघून तो एवढा हुरळून गेला की, करीन तर हिच्याशीच लगीन करीन म्हणाला न् त्यानं हिला चुटकीसरशी उचलून आपल्या पाठीवर बसवली आणि गेला की एका बिळात घेऊन! आता काय करायचं? असल्या काळुंद्र्याबरोबर कोण लगीन करील? तिनं आपल्या मनाशी पक्का बेत केला. एका कोपऱ्यात अंधारात जाऊन बसली. तर तिला काय काय खायला देत उंदीर कसा म्हणतो, "तुला एक पोपट दिसलावता का पुट्टे?" लाल लाल चोच. हिरवंगार अंग. गातेला. बोलतेला." तशी हिला उत्सुकता लागली. हिनं त्याला विचारलं, "कशाला पाइजे?"

"भेटलावता काय सांग."

"कशाला पाइजे ते पैलं सांग."

"तो माझा दोस्त होता. परीनं त्याला हाकलून दिलं."

"कारण?"

"त्यानं तिच्याशी लगीन केलं नाही म्हणून."

"खरंच ?"

"हं! म्हणून ती फुलं पळवते. फुलांची वस्त्रं गुंफून घेते. फुलं बागेत झाडावर राहिली की, पोपट येईल न् घेऊन जाईल म्हणते."

"अस्सं!"...

"मला खूप आवडतो माझा दोस्त. मी हिंडहिंड हिंडलो. पण पत्ताच नाही. कोण्या म्हातारीनं लेकागत सांभाळलाय म्हणतात."

हे ऐकून पुटाक्का गंभीर झाली. आपल्या पोपटदादाबद्दल परीच्या मनात काळंबेरं असलं पाहिजे याबद्दल तिची खात्री पटली. म्हणून ती या उप्पर काहीच बोलली नाही. मनातल्या मनात तिनं देवाला हात जोडले, "माझ्या दादाला सांभाळ बाबा." आणि ती गप्प राहिली. म्हणून मग उंदीर बोललाच नाही. हिच्यासाठी फुलं घेऊन येतो म्हणून तिथून बाहेर गेला. हिनं आवतीभोवती पाहिलं. एक मुंगी तिथून चालली होती. हिनं तिला हाटकली. येथून मला घेऊन कुठे तरी दूर दूर चल म्हणाली. तिनं आपल्या मागोमाग ये म्हटलं. ही निघाली. वाट मऊ मऊ होती. चढणाची होती. लांबलांबची होती. पण ही गेली. रांगत, चालत. थांबत, बोलत.

होता होता मग त्या मुंगीनं तिला एका जंगलात आणली. एका दांडग्या झाडाखाली बैस म्हटलं न् स्वतः एका बिळात घुसली. त्यासरशी त्या झाडावरून पोपटाचा आवाज आला, "ताईऽऽ ताईऽऽ" हिला नवल वाटलं. मान वर करून बघू लागली. पण झाड दाट पानाचं. खालचं वर दिसेना. वरचं खाली दिसेना अशातली गत झाली. म्हणून ही झाडावर चढायला लागली तर झाड कसं उंच उंच व्हायला लागलं. चढण जशी संपेचना. पोपटाचा तर आवाज सारखा येतेला. आता काय करावं ?" हिचा जीव दमून गेला. साती आसरा भेटाव्यात, आईची वाट दिसावी. दादाची गाठ पडावी. पुटाक्काला ध्यास लागला.

तेवढ्यात एका खारूताईनं हिला बघितलं न् आपल्या शेपटात गुंडाळून पळवली. ती गेली ती तुरु तुरु झाड चढून वर वर. म्हणताना एका उडत्या सुतार पाखरानं हिला पटकिनी चोचीत

धरली न् गेला उंच भराऱ्या मारीत. ही पार भेदरून गेली. आईच्या न् दादाच्या नावानं घोकण्या घालायला लागली. तशी सुतारपक्षी कसा म्हणतो, "तू माझी राणी. मी तुझा राजा. कसली आलीय आई न् कसला आलाय दादा? मी म्हणेन तशी आता उठायची धजा."

"अग बाई!" पुटाक्काला कसं खुळचागत झालं. बसली गपचूप. नाजूक नारीला, आभाळातली गार हवा सोसावी कशी? गेली गारठून. सुतार पक्ष्यानं तिला एक उंच डोंगरावर नेऊन ठेवली. आणि बसला तिच्याबरोबर गुलूगुलू बोलत. पण हिचं ध्यान कुठं ठिकाणावर होतं? घडल्या गोष्टींनी ती हाडबडून गेलीवती. कुणीपण धसमुसळचा हिच्यासंगं लगीन कराय निघालावता! आणि ही एकली एकली नको त्याच्या तडाख्यात गवसत होती. म्हणताना स्वतःच्या चिटुकलेपणावर ती चिडून गरजली, "लांब बैस तू. मला नाही लगीन करायचं." तशी सुतार पक्षी गुरगुरला, 'जाशील कुठं? करीत नाहीस कशी ते बघतो." आणि तिला त्यानं चोचीनं असा दणका दिला की ती पट्दिशी खाली पडली न् डोंगराच्या घसरणीवरून गडगडत गडगडत खोल दरीत जाऊन आदळली. तिचं अंग ठेचून निघालं. रक्ताळलं. घामेजलं. थरथरलं. "आईऽऽ दादाऽऽ" करीत तिनं आक्रोश मांडला जसा. त्या कारणानं ती सारी दरी दणाणली.

तेवढ्यात तिकडून एक भला दांडगा नाग फुस्कारत आला. हिला पाहिल्याबरोबर त्यानं फणा काढला. शेपटीनं हिला उचलीत त्यानं आपल्या फण्यावर बसवली न् पुन्हा सळसळत सुसाटत आपला निघाला. मग वाटेत त्यानं झाडपाल्याची औषधं हिला केली. जखमा बांधल्या. खाणंपिणं दिलं न् पुन्हा हिला डोक्यावर घेऊन तुझ्या आईकडे नेतो म्हणून निघाला. तर वाटेत एक भली दांडगी गुहा लागली न् त्यातून आक्राळ विक्राळ राक्षस बाहेर आले. नाग दचकला न् ही हेंदकाळली. तशी राक्षस हिला पकडायला पुढं धावले

म्हणताना नाग जोरानं फुस्कारला. कडाडून चावा घेईन म्हणाला. पण राक्षसांनी हिला पकडायचा जसा चेव धरला. मग ह्यानं खडी उंची धारण करीत राक्षसांच्या बरोबर लढाई सुरू केली. तर ते पडले पाच सात न् हा एकटा. म्हणताना हिला भेटलेला तो उंदीर, तो बेडूक, ती मुंगी, ती परी, तो सुतार पक्षी न् तो पोपट झाडून सारे वेष बदलून तिथं आले न् त्यांनी त्या राक्षसांचा समाचार घेत पुटाक्काला एका उंच दगडावर बसवली न् सगळे निघून गेले. पण तो पोपट न् ती परी मात्र मागं राहिले. त्यांनी हिच्याबद्दल काही भाषा केली. त्यामुळं ही काही म्हणणार तर ती परी निघून गेली न् पोपटानं हिला आपल्या चोचीनं उचलून त्या गुहेत नेली. तर तिथं वाटेत एक भला दांडगा राक्षस घोरत पडलेला. शेजारी हंडाभर दूध उकळतेलं. तर पोपटानं पुटाक्काला एका दिवळीत बसवली न् ते उकळतं दूध त्या राक्षसावर ओतलं. तसा तो तडफडून मेला. मग पुटाक्काला घेऊन पोपट आत गुहेत गेला. खूप आत आत दोघेजण गेले. तिथं सुंदर राजवाडा होता. हंड्या झुंबरांचा चहूकडे लखलखाट झालेला. दीपमाळा पाजळतेल्या. पक्षी गातेले. माकडं नगार नौबत झडवतेले. मुंगळे तुतारी फुंकतेले. वानरं काम करतेली. तर ते बघून पुटाक्का भुलून गेली. पोपटाला सोडून एकलीच लुटूलुटू निघाली. बघतेय तर तिथं इवलासा डोंगर विडी ओढतेला. इवलीशी नदी फुगडी खेलतेली. सातरंगी कमान मागं मागं होतेली. आणि पोपट गमती जमती सांगत सोबत करतेला. म्हणताना ही हवेतून तरंगावं तशी झोकात निघाली.

जिकडं बघावं तिकडं तिथं गंमत जंमतच. ही जवळ आली की, भिंतीवरची चित्रं सजिवंत होत होत पुढं यायची. हिला नमस्कार घालायची. हिच्याबरोबर बोलायची. त्यावेळी हिचं बोलणं निघा-यचं ते जलतरंगासारखं काळजाचा ठाव घेणारं. ही हसायची ती सुखाची कारंजी उसळावीत तशी. आणि ही चालायची ती आवती-भोवती फुलांचे ताटवे घेऊनच. त्यामुळे त्या दुनियेला जशी जाग

आलीवती न् रत्नामाणकांचा उपसा व्हावा तसा सुखाचा डोंगर जिथं तिथं धा धावून पुढं यायचा.

होता होता सात दालनं ओलांडून ही पुढं आली तर तिथं हिचा पोपटदादा होता. त्याला बघून हिचा आनंद गगनात मावेना. त्यानं हिला प्रेमानं जवळ घेतली. झालं गेलं सारं आठवीत हिनं त्याला सांगितलं. मग दोघे पुढं निघाले. तर तिकडून ह्या पुटाक्काएवढाच एक देखणा पिटुकला राजा ह्यांना सामोरा येतेला. बरोबर लवाजमा. हत्ती, घोडे, उंट, येतेले. ताशे तर्फे वाजतेले. रंभा नाचतेल्या. शिंग घुमतेलं. चांदण्याची रिमझीम होतेली. सुवासिक फुलांचे फवारे उडतेले. मखमलीचा सडा होतेला. तर ते सगळं बघून ही भांबावून जातेली. पोपटदादा हारखतेला.

राजा पुढं पुढं आला मात्र न् इकडे त्या म्हातारीला जाग आली. त्यासरशी तिनं आपल्या लेकीला हाकारा घातला. पण ती निजलीवती तिथं होतीच कुठं न् तो पाळणा तरी होता कुठं? म्हातारीचा जीव उडून गेला. तिनं झटक्यासरशी आपल्या अंगणातला खराटा घेऊन उंच आभाळात फेकला न् तरंगत्या ढगाला खाली ये म्हणाली. खराटयाच्या फटकाऱ्यासरशी ढग खाली उतरला. म्हातारीनं मग आपल्या डोळयांत चंद्रसूर्य बसवले. ढगावर स्वत: बसली न् लेकीच्या शोधाला चल म्हणून तिनं ढगाच्या पाठीत रपाटा घातला. त्यासरशी ढग म्हातारीला घेऊन उंच उडाला आणि साता समुद्रापलीकडं पुटाक्का राजाच्या वाडयात उभी होती तिथं या म्हातारीला घेऊन आला.

म्हातारी लेकीला बघून एवढी सुखावली की, तिनं पोट भरस्तोवर तिचे मुके घेतले. मग राजानं म्हातारीजवळ पुटाक्काची मागणी केली. तशी हिला कोण आनंद! काय करू न् काय नको अशा धांदलीत हिनं त्या पोपटाला पिटाळून लग्नाचं सामान आणलं. मग या राजाचं न् पुटाक्काचं झोकात लगीन लागलं. सगळीकडे आनंदी आनंद झाला. त्यांनी मग सुखानं राज्य केलं तसं ते तुम्ही आम्ही पण करूया.



# शेरास सव्वाशेर

**निवेदक : डॉ. म. अ. दळवी**

आटपाट नगर होतं. तिथं एक गरीब बिचारा म्हातारा माणूस रहायचा. तर या म्हाताऱ्याला काम कोण देणार? आणि त्याच्यानं काम तरी असं मोठं काय होणार? त्यातून त्याच्या नशिबी मिळाली होती एक कजाग वायको. तिच्या तोंडाचा पट्टा सारखा चालू असे. रात्रंदिवस ती त्याला म्हणायची, "कामधंदा होत नाही काय? साऱ्या खस्ता मीच खाते, सकाळसांज मी राबते, आहे काय मेलं



या घरात? समजलं का, आज घरात खायला वीषसुद्धा नाही! चालते व्हा आणि काही कामधंदा करून गिळायला काही घेऊन या." घरातली भांडी फेकून द्यायची. दाण दाण पाय आपटायची आणि सतत शिव्यांची लाखोली वहायची. त्यामुळं त्याचं जगणं मोठं कठीण झालं होतं. आयुष्याचा वीट आला होता त्याला. म्हणून त्यानं निश्चय केला, "काही होवो, आज घरी म्हणून रहायचंच नाही." नंतर तो हळूहळू घराबाहेर आला व हमरस्त्याच्या कडेनं एक झाड होतं तिथं येऊन बसला.

होता होता त्याच्या मनात एक विचार आला, "अरे शहरात जाऊन तरी पहावं आपलं भाग्य उजळतं का ते? न जाणो, परमेश्वर तिथं यश देईल," म्हणून तो शहराच्या दिशेनं चालू लागला. तर काहीशा अंतरावरच त्याला एक विहीर आढळली. म्हणून त्या विहिरीच्या बांधावर बसून तो पाणी प्याला आणि घटकाभर शांत बसला.

तेवढ्यात कुठून तरी कोणी तरी लांबून येताना त्याला दिसलं. म्हणून तो उठला तर समोर त्याची बायको! वसकन् त्याच्या अंगावर धावली. फडाफड बोलली. त्यामुळं रागारागानं त्यानं तिला विहिरीत ढकलून दिलं न् "गेली एकदाची कट कट!" असं म्हणाला. आता तरी जिवाला शांती लाभेल म्हणाला. आणि शहराकडं झपाझप चालला. थोडंफार अंतर त्यानं तोडलं असेल नसेल तेवढ्यात आपल्याला कोणी हाक मारीत आहे असं त्याच्या लक्षात आलं. या वेळेला चिंता नव्हती. कारण कुणाच्या मदतीशिवाय त्याच्या बायकोला विहिरीतून वर येता येणं शक्य नव्हतं व तसं व्हायचं म्हटलं तरी खूप वेळही लागणार होता. त्याला ही खात्री होती की कुणी बुडेल एवढं पाणीही त्या विहिरीत नव्हतं. मग हे कोण बोलावीत आहे बरं? तो विचार करतोय एवढ्यात एकजण तिथं येऊन म्हणाला,–"अहो. . .अहो, तुम्हीच ना त्या भयंकर स्त्रीला माझ्या विहिरीत ढकलून दिलीत? तिला घेऊन जा बघू? मी माझ्या

विहिरीत किती आनंदानं आणि समाधानानं रहात होतो. पण त्या भयंकर स्त्रीनं सारी विहीर डोक्यावर घेतली आहे! मला राहणं कठीण केलं आहे तिनं!"

ह्यानं मग ओळखलं की, हा कुणी पिशाच्यांपैकीच एक असावा. म्हणून त्यानं आपली करुण कहाणी त्याला सांगितली. पिशाच्चाला त्याच्याबद्दल सहानुभूती वाटली आणि दोघांनी एकत्र रहावयाचं कबूल केलं. पिशाच्चानं मग जादू करून त्या दोघांसाठी खूप संपत्ती उभारली आणि ते आनंदानं जीवन घालवू लागले. मग काही वर्षांनी पिशाच्च म्हणालं, "दोस्त आता मला माझ्या योनीत जायला हवं. खूप वर्षे मी तुझ्याबरोबर सुखानं काढली. आता तुझा मार्ग वेगळा. माझा वेगळा. येतो मी."

"असं करू नकोस. मला दु:खात सोडून तू जाऊ नकोस. कसे दिवस गेले कळलंसुद्धा नाही, बघ तुझ्या संगतीत. माझ्यावर दया कर."

"अरे तू घाबरू नकोस," पिशाच्चानं आश्वासन देत म्हटलं, "मी तुला खूप धन देऊन जाणार आहे. मग तर झालं?"

"धनाचं काही मला मोठं नाही तुझ्यापुढं."

पिशाच्चानं त्याची नंतर समजूत काढली व त्यास धन मिळवून देण्याची रीतही सांगितली.

पिशाच्च राजाच्या मुख्य वजिराची जी मुलगी होती तिच्या अंगात आता शिरणार होतं. तिला सतावणार होतं. भिकाऱ्यानं तिच्या वाड्यात जायचं. मुख्य वजिराकडून एक लक्ष मोहरा शुल्क घ्यावयाचं असा बेत होता. त्यात एक काही कमी मोहर नाही का एक जास्तही होणार नव्हती. म्हणून आहे त्यात त्यानं सुखी रहावयाचं होतं. पिशाच्च वजिराच्या मुलीच्या अंगातून एक मंत्र म्हणताच दूर होणार होतं. अट एकच होती की, मंत्र फक्त एकदाच म्हणावयाचा होता.

"लक्षात ठेव, ही जी मी तुला धनिक होण्याची संधी देत आहे ती फक्त एकदाच आहे. पुन्हा जर मंत्र म्हटलास तर इतर पिशाच्चे जसं ग्रासतात तसं मी तुला ग्रासीन. लाग मग तयारीला." अशी जाणीव देऊन ते पिशाच्च निघून गेलं.

मुख्य वजिराची लाडकी व लावण्यवती कन्या अत्यंत आजारी असल्याची बातमी झपाट्यानं साऱ्या शहरात पसरली. हकीम वैद्यांची रीघ वजिराच्या वाड्यावर लागली. सुचतील त्या उपायांची फैर झडली. मी मी म्हणणारे मांत्रिकही हतबल झाले. यज्ञ झाले. दानं देऊन झाली. पण काही उपयोग झाला नाही.

संकेताप्रमाणं भिकारी भारदस्त पोषाख घालून व वजिराच्या देवडीवर येऊन उभा राहिला. क्षणाचाही विलंब न लावता द्वार-पालांनी त्यास तडक राजकन्येच्या महालात नेलं. वजिराशी त्यानं शुल्कबद्दल बोलणं केलं. वजिराला एवढी रक्कम देणं कठीण होतं. पण त्याचा नाइलाज होता. त्यानं मोहोरांची थैली भिकाऱ्याच्या हाती दिली. मग त्या भिकाऱ्यानं पिशाच्चानं पढविलेला मंत्र मोठ्या गंभीरपणे म्हटला. पिशाच्च हटलं. अन् वजीरकन्या जणू काहीच झालं नव्हतं अशी खडखडीत बरी होऊन बसली. सर्वांना आनंद झाला. भिकारी महान मांत्रिक ठरला. वजिरानं अत्यानंदाने आपल्या मालमत्तेचा अर्धा हिस्साही त्याला दिला.

काही दिवस मग असेच आले व गेले. सगळीकडे बातमी पसरली की, राजकन्याच आजारी पडली आहे. वेडेचार करीत आहे. साह-जिकच भिकाऱ्यास बोलावणं गेलं. तो मोठ्या पेचात आला. राजाची अवज्ञा करावी तर मान उडते. पिशाच्चाची अवज्ञा करावी तर पिळवणुकीला पुन्हा तयार रहावं लागेल. इकडे आड तिकडे विहीर असं त्याला झालं. तो अळंटळं करू लागला. राजानं शिरच्छेद करण्याची धमकी घातली. या मध्यंतरीच्या काळात त्याला कळलं होतं की, लोकांनी त्याच्या कजाग बायकोला विहिरीतून वर काढलं

होतं. त्याला वाटलं आता सर्वनाशच ओढवून आला आहे. शेवटी त्यानं पिशाच्चाचा मंत्र अट मोडून पुन्हा म्हटला. त्याबरोबर पिशाच्च राजकन्येला सोडून गेलं. मांत्रिकाला जीवदान मिळालं. मोहरा मिळाल्या. शहाणपणानं हे शहर सोडून तो आपल्या गावाकडं जाऊ लागला. त्या विहिरीशी येताच पिशाच्चानं त्याला अडवलं, "तू माझी अट मोडलीस. मी आता तुझ्या शरीरात शिरणार आणि तुझं जिणं नकोसं करणार."

पण ह्यानं मोठ्या अक्कलहुशारीनं म्हटलं, "दोस्ता, मी तुझा अपराध केला आहे. नाइलाज झाला माझा म्हणून मी दुसऱ्यांदा तो मंत्र म्हटला. पण या उप्पर जर तुला मला त्रासच द्यावयाचा असेल तर खुशाल दे. पण लक्षात ठेव माझ्या बायकोला लोकांनी वर काढलं आहे. तिला मी तुझ्या अंगावर सोडलं तर तुला कसं वाटेल?"

पिशाच्चानं ते ऐकताच तेथून सरळ पळ काढला. मग या भिकाऱ्यानं आपली सुटका आपल्या अक्कलहुशारीनं करून घेतली.





# फुटका हंडा

**निवेदिका : सौ. शरदिनी मोहिते**

एका गावामध्ये एक गरीब माणूस रहात होता. रामजी त्याचं नाव. मोलमजुरी करून येणाऱ्या पैशात स्वतःचं, बायकोचं आणि

मुलांचं पोट भरताना त्याच्या नाकात दम येत असे. भरीत भर अशी की, बाळविधवा अशी त्याची बहीण मथुरा त्याच्याकडेच रहायला होती. बहीण त्याला जड झाली होती असं नाही, पण मूळची परिस्थितीच अतिशय गरिबीची त्यामुळे सारं जमवून घेताना खटके उडायला लागले. मथुरा आपल्या भावासाठी भावजयीची बोलणी सहन करायची. पण भावजयीच्या बोलण्याला आणि उणीदुणी काढण्याला मुळी अंतच नव्हता.

रामजी आणि त्याची बायको मोलमजुरी करायची आणि मथुरा घर सांभाळायची. स्वयंपाकपाणी करायची, पाणी भरायची, झाडलोट करायची, भावाच्या मुलांचं सारं काही करायची, पण एवढं करूनही भावजय म्हणायची, "आम्ही मरायचं, मिळवून आणायचं आणि हिनं बसून खायचं आयतोबासारखं." ही बोलणी मथुरेला पाठ झाली होती. कानांवर पडली तरी मनात शिरू द्यायची नाही ती. पण एकदा भावजय भलतंच बोलून गेली. म्हणाली,— "नवरा खाऊन बसली हडळ, आणि आता आमचा जीव घ्यायला बसलीय इथं येऊन."

हे ऐकताच मथुरेच्या काळजाचं पाणी झालं. ती घर सोडून बाहेर पडली. रानी वनी हिंडू लागली. स्वतःच्या नशिबाला बोल लावीत असतानाच तिला आपल्या भावाची ओढगस्त आठवायची. त्याची परवड आठवायची आणि तिचा जीव कासावीस व्हायचा. . .ती रडत बसायची. अशीच एकदा एका वनात बसून ती रडत होती. तर त्या अंधाऱ्या वनात एकदम प्रकाश झळाळला, मथुरा चपापली. सावरून बसली आणि काय काय घडतंय म्हणून अंदाज घ्यायला लागली. एक अतिशय तेजस्वी देवता तिच्या पुढ्यात उभी होती आणि कनवाळूपणानं तिची विचारपूस करत होती. त्या देवतेच्या देखणेपणामुळं दिपून गेलेल्या मथुरेनं सांगता येईल तेवढं सांगितलं

आणि देवतेकडे मोठ्या आशेने पहायला लागली. तेव्हा देवता म्हणाली,——

"हे बघ, मी तुला एक वस्तू देते. एक फुटका हंडा तुला या झाडाखाली पुरलेला आढळेल. तो उकरून काढ आणि घरी ने. तू जे जे मागशील ते ते देईल तुला तो. फुटका असल्याने तो चोरीला जायची भीती नाही . . .पण सांभाळ त्यालासुद्धा . . .त्याचा गुण घरातल्या माणसांखेरीज कुणाला कळता कामा नये. कळला, तर तो वितळून जाईल."

मथुरेनं भारावून जात देवतेचे पाय धरले. आपल्या आसवांनी ते धुवून काढले. देवता मग गुप्त झाली, जाता जाता म्हणाली, "सुखानं रहा बाई."

मग मथुरा सावध झाली. देवतेच्या सांगण्याप्रमाणे तिनं झाडाखालच्या जमिनीतून फुटका हंडा बाहेर काढला आणि नंतर तिनं आपलं गाव जवळ केलं. ती परत आली आणि तेसुद्धा फुटका हंडा घेऊन. हे पाहताच भावजय फणकारली. नाक मुरडून झटक्यानं घरात गेली.

पण मथुरेनं ते मनावर घेतलं नाही. भावाला एकीकडे घेऊन तिनं हंड्याची हकिगत सांगितली. भावानं ती आपल्या बायकोला सांगितली. गंमतच वाटली तिला या बहीण-भावाच्या गोष्टीची. ती म्हणाली,——

"असं? मग पाहूयाना काही तरी मागून. वन्सं, माझ्यासाठी पैठणी मागा हंड्याजवळ."

मथुरेनं पैठणी मागताच चांगली वजनदार पैठणीची घडी पुढ्यात येऊन पडली. मग मात्र भावजयीची फिणफिण थांबली ती कायमची.

बायकोनं पैठणी मागितली हे रामजीला आवडले नाही. त्यानं दारं बंद करून घेतली, आणि पंगत बसवून पंचपक्वान्नांची ताट

साऱ्यांसाठी मागितली. जन्माला आल्यास आज साऱ्यांची पोटं छान भरली. . .

हंड्याची गोष्ट बाहेर कोणी फोडली नाही. परंतु संपत्तीचा झरा यांना एकदम कुठून गवसला म्हणून गावात कुणकुण सुरू झाली. बहीण-भावांनी मग बेत केला की, "देणारा देत असला तरी आपण मागणीच बेताची ठेवायची, निमित्ताला कामाला बाहेर पडायचं."

असं सगळं समजुतीनं घेतलं. पण एकदा काय झालं भावजयीला वाटलं की हा काळा कुद्रा फुटका हंडा वाड्यात ठेवलाच कशाला म्हणून ही कोणी शंका घेईल तेव्हा आपण जरा चिंच शिकेकाईने घासून स्वच्छ तरी करावा. म्हणून तिनं तो घासायला घेतला तशी तिचा हात अगदी झणझणून भाजला ! आणि हंड्यातून आवाज आला, "पुन: म्हणून असं काही करू नकोस. मरशीलच झटका बसून."

भावजयीनं झाली गोष्ट नवऱ्याला नि नणंदेला सांगितली. सर्वांच्याच मनात हंड्याबद्दल एक प्रकारचा धाक निर्माण झाला. मथुरेच्या भावजयीनं हंड्याचा धसकाच घेतला. पुन: ती हंड्याच्या वाटेला तर गेली नाहीच, पण त्यानंतर तिनं स्वत:साठी काही मागूनही घेतलं नाही. त्यामुळे भपकेबाज वस्तू घरात कमी यायला लागल्या व बाहेरच्या उपटसुंभांना शंका यायला कारणच उरलं नाही. सारं काही सुरळीत व्हायला लागलं.

रामजीच्या या बहिणीमुळं त्या साऱ्यांचं नशीब उघडलं. आपली गरिबी आणि आपले हाल जिनं नाहीसे केले त्या नणंदेला भावजय त्रास देईनाशी झाली. उलट तिला कसलाही त्रास न पडेल असं पाहू लागली. त्यामुळे घरात निर्माण होणारी भांडणं दूर पळाली, सगळीकडे सुख आणि समाधान भरून राहिलं. मग आनंदी आनंद त्यांच्या घरात नांदू लागला.





# अक्काबाईचा फेरा



**निवेदक :**

**श्री. श्रीपाद जोशी**

एका गावात एक गरीब ब्राह्मण रहात होता. त्याच्या हाताला यश म्हणून नव्हतं. कितीही धडपड केली तरी जेमतेम एक वेळ पोटभर जेवण मिळेल एवढीच कमाई त्याला होई. याचं कारण त्याच्यावर अक्काबाईचा फेरा आलेला होता. अक्का-बाई म्हणजे दुर्दैव किंवा ग्रहदशा. तर या ब्राह्मणाला दोन मुली होत्या. त्या मोठ्या होऊन लग्नाला

आल्या होत्या. ब्राह्मणाची बायको एक दिवस त्याला म्हणाली, "अहो, या पोरींच्या लग्नाची काही काळजी—फिकीर तुम्हांला आहे की नाही?"

ब्राह्मण म्हणाला, "लाख फिकीर आहे. पण करायचं काय? ही अक्काबाई पाठ सोडील तेव्हा ना? तिच्यामुळं हातात एक पैसा टिकत नाही. जवळ पैसा नसताना मुलीचं लग्न कसं होणार?"

बायको म्हणाली, "अहो, म्हणून काय गप्प बसून राहायचं?" काही तरी हातपाय हे हलवलेच पाहिजेत. मी तुम्हांला एक उपाय सांगते. उज्जैनीचा राजा विक्रमादित्य मोठा दयाळू आहे. तो कुणाला निराश करीत नाही. कुणाला रिकाम्या हातानं परत पाठवीत नाही असं म्हणतात. तुम्ही त्याच्याकडे जाऊन आपली अडचण सांगा. तो जरूर मदत करील.

ब्राह्मणाला बायकोचं म्हणणं पटलं. तो उज्जैनीला गेला. विक्रमादित्याच्या दरबारात जाऊन त्यानं "महाराजांचे कल्याण होवो." असा आशीर्वाद दिला. राजानं ब्राह्मणाला प्रणाम करून विचारलं, "पंडितजी, आपण कशासाठी इथवर येणं केलं?" ब्राह्मणानं सांगितलं, "माझ्या घरी दोन मुली लग्नाला आल्या आहेत. परंतु त्यांची लग्नं करायला माझ्याजवळ एक पैसाही नाही."

राजानं विचारलं, "लग्नाला किती रुपये लागतील?"

ब्राह्मणानं उत्तर दिलं "तीनशे".

राजानं आपल्या खजीनदाराला हुकूम केला, "या भटजींना तीनशे रुपये द्या."

ब्राह्मण रुपये घेऊन घरी परतला. तो आपल्या बायकोला म्हणाला, "हे पहा, तीनशे रुपये आणले." ते ऐकून बायकोला फार आनंद झाला. नंतर ब्राह्मणाने चुलीजवळ एक खड्डा खणून ते रुपये पुरून ठेवले.

परंतु रात्र होताच अक्काबाई आली, आणि ती ब्राह्मणाला म्हणाली, "चल, काढ ते पैसे राजाकडून आणलेले." ब्राह्मण म्हणाला, "मी नाही बा आणले राजाकडून पैसे!" यावर अक्काबाई म्हणाली, "अस्सं खोटं बोलतोस काय? तिथं चुलीजवळ काय पुरून ठेवलंय?" त्यामुळं विचाऱ्या ब्राह्मणाला ते रुपये काढून द्यावे लागले. तो पुन: पूर्वीसारखा दरिद्रीच राहिला.

काही दिवस गेल्यानंतर ब्राह्मणाच्या बायकोनं पुन: राजाकडे जाण्याचं टुमणं त्याच्यामागे लावलं. ब्राह्मण म्हणाला, "आता कोणत्या तोंडाने राजाकडे जाऊ? एकदा त्याने पैसे दिले. पुन: पुन: कोण द्यायला बसलंय?".

बायको म्हणाली, "असा विचार तुम्ही मनातही आणू नका. राजा फार चांगला आहे. त्यानं इतरांना मदत करण्याचं व्रत घेतलंय. तो तुम्हांला रिकाम्या हातानं परत पाठवायचा नाही."

बायकोनं फार आग्रह केल्यामुळं ब्राह्मण पुन: राजाकडे गेला. राजानं पूर्वीप्रमाणंच त्याच्या येण्याचं कारण विचारलं. ब्राह्मणानं पुन: मुलींच्या लग्नासाठी तीनशे रुपये मागितले. राजाने खजीन-दाराला सांगून ब्राह्मणाला पैसे देवविले. ब्राह्मण पैसे घेऊन घरी आला.

या खेपेला ब्राह्मणानं ते पैसे आपल्या खाटेच्या पायाखाली पुरून ठेवले. परंतु रात्र होताच पुन: अक्काबाई आली आणि राजाकडून आणलेलं धन मागू लागली. ब्राह्मण यावेळीही खोटं बोलला. तो म्हणाला, "मी नाही बा आणले राजाकडून पैसे." यावर अक्काबाईनं खाटेच्या पायाखाली पुरलेलं धन काढून द्यायला त्याला सांगितलं. अखेर ब्राह्मणाला त्या तीनशे रुपयांवरही पाणी सोडावं लागलं.

दारिद्र्य वाढत होतं आणि मुलींची वयंही वाढत होती. त्यांच्या लग्नाच्या काळजीमुळं ब्राह्मणाच्या बायकोला झोप येत नव्हती. तिनं पुन: ब्राह्मणाच्या मागे राजाकडे जायची भुणभुण लावली.

अखेर ब्राह्मण नाइलाजानं राजाकडे गेला आणि त्यानं मुलींच्या लग्नासाठी तीनशे रुपये मागितले. राजानं पैसे दिले खरे, परंतु त्याच्या मनात विचार आला, मी एखाद्याला एकदा पैसे दिले की त्याला पुन: पैशासाठी माझ्याकडे यायची जरूर पडत नाही. पण हा ब्राह्मण तीनदा पैसे मागायला आला. यात काय गोम आहे ती पाहिली पाहिजे.

असा विचार करून तो गुपचूपपणे ब्राह्मणाच्या मागोमाग गेला. ब्राह्मण आपल्या घरात गेल्यावर राजा बाहेरच थांबला. थोड्या वेळानं रात्र झाली. ठरल्याप्रमाणं अक्काबाई आली आणि ब्राह्मणाजवळचे पैसे घेऊन बाहेर पडली.

राजा हे सारं बघत होता. तोही अक्काबाईच्या मागोमाग चालू लागला. गावाबाहेर गेल्यावर त्यानं अक्काबाईचा हात धरला आणि विचारलं, "तू कोण आहेस? तू त्या ब्राह्मणाचं धन का काढून घेतलंस?" यावर अक्काबाईनं उत्तर दिलं, "मी अक्काबाई आहे. लक्ष्मीची थोरली बहीण. कुणीकुणी मला अवदसा म्हणतात. मी ज्याच्या मागं लागते त्याच्या हातात एक कवडीही टिकू देत नाही. सध्या मी त्या ब्राह्मणाच्या राशीला लागले आहे. म्हणूनच त्याची अशी दुर्दशा झालीय.

राजानं विचारलं, "तू त्याच्या राशीला किती दिवस राहणार आहेस?"

अक्काबाईनं उत्तर दिलं, "त्याच्या राशीला लागून मला चार वर्षं झाली. अजून आठ वर्षं मी तिथं राहणार आहे."

राजा म्हणाला, "त्या बिचाऱ्याला कसंही करून तुझ्या फेऱ्यातनं सोडवलं पाहिजे. काय केलं असता तू त्याला सोडशील?"

अक्काबाईनं उत्तर दिलं, " त्याला एक उपाय आहे. त्याच्याऐवजी जर कुणी स्वत:वर हा फेरा लादून घेतला तर मी त्याला सोडून देईन."

राजा म्हणाला, "ठीक आहे. तू त्याला सोडून दे आणि माझ्या राशीला लाग. मी कशीबशी आठ वर्षं काढीन. इतरांच्या उपयोगी पडण्यातच मला आनंद वाटतो. म्हणून त्या ब्राह्मणाची साडेसाती मी माझ्यावर घेतो."

अक्काबाई म्हणाली, "काही हरकत नाही. आजचा दिवस लक्षात ठेव. मी ब्राह्मणाला सोडून आता तुझ्या राशीला लागते."

राजानं मनाशी विचार केला. आता राजधानीला जाण्यात काही अर्थ नाही. हा आठ वर्षांचा काळ बाहेरच हिंडून फिरून घालवला पाहिजे. असा विचार करून तो तेथून निघाला. वाटेत त्याला एक विहीर लागली. रात्र घालवण्यासाठी तो तिच्या काठीच झोपला. इकडे ब्राह्मणाचे दिवस फिरले. एका घरातून त्याला मिळालेल्या शिध्यात कुणी तरी दोन मौल्यवान रत्ने टाकली होती. ती रत्नं विकून तो चांगला श्रीमंत बनला. त्यानं आपल्या मुलींची लग्नं थाटामाटात करून दिली आणि तो सुखानं राहू लागला.

याच्या उलट राजाची दुर्दशा सुरू झाली. ज्या विहिरीच्या काठावर तो झोपला होता तिथंच काही चोर चोरीचा माल घेऊन आले. त्यांनी त्या देशाच्या राजाच्या राजवाड्यातच चोरी केलेली होती. त्यांनी चोरीचा माल आपसात वाटून घेतला. परंतु एक शेला उरला. त्याची वाटणी करता येईना. म्हणून त्यांनी तो शेला जवळच झोपलेल्या विक्रमादित्याच्या अंगावर टाकला आणि ते निघून गेले. दुसरे दिवशी सकाळी राजाचे शिपाई चोरांचा माग काढीत त्या विहिरीजवळ आले. विक्रमादित्याच्या अंगावर तो शेला पाहताच त्यांनी त्यालाच चोर समजून पकडलं आणि राजापुढं आणून हजर केलं. राजानं विक्रमादित्याचं काही एक ऐकून न घेता त्याचे हातपाय तोडण्याची शिक्षा फर्मावली. त्याप्रमाणं शिपायांनी त्याचे हातपाय तोडले आणि त्याला नदीच्या काठावर टाकून दिलं.

कुणा येणाऱ्या-जाणाऱ्याला दया येई आणि तो विक्रमादित्याला काही तरी खायला देई. एक तेली रोज त्या रस्त्यानं तेल विकायला

जायचा. विक्रमादित्यानं त्याला विनंती केली, "तेलाचा एक बोळा माझ्या जखमांवरून फिरव, म्हणजे आग थोडी कमी होईल." तेल्याला त्याची दया आली. त्यानं तेलाचा बोळा त्याच्या जखमांवरून फिरवला. त्या दिवशी त्याच्या तेलाला रोजच्यापेक्षा जास्त किंमत आली. दुसऱ्या दिवशी त्यानं पुनः तेलाचा बोळा फिरवला. त्या दिवशी त्याला आणखीच जास्त पैसे मिळाले. अशा प्रकारे दिवसेंदिवस तेल्याला अधिकाधिक पैसे मिळू लागले.

तेल्यानं ही गोष्ट तेलणीला सांगितली. ती आनंदून म्हणाली. "अशा माणसाला खरं म्हणजे आपल्या घरीच आणून ठेवलं पाहिजे." तेल्याला तिचं म्हणणं पटलं आणि तो विक्रमादित्याला आपल्या घरी घेऊन आला. त्यानं त्याच्या थोटच्या हाताला एक चाबूक बांधला आणि त्याला घाण्यावर बसवलं. विक्रमादित्य त्याचा घाणा चालवू लागला. पूर्वी जिथं दिवसाभरात एक घाणा निघत होता तिथं आता तीन घाणे निघू लागले. तेल्याची भरभराट होऊ लागली.

उन्हाळ्याचे दिवस होते. भर दुपारची वेळ. खूप उकाडा होत होता. अशा वेळी विक्रमादित्यानं घाण्यावर बसल्या बसल्या मेघ-मल्हार राग आळवायला सुरुवात केली. त्या रागाच्या प्रभावामुळं निरभ्र आकाशातून अकस्मात पाऊस पडू लागला. राजकन्येनं आपल्या महालाच्या गच्चीत जाऊन पाहिलं. ढगांचा पत्ता नव्हता अन् तरी पाऊस पडत होता. इतक्यात तिच्या कानांवर मेघमल्हाराचे सूर आले. ते सूर तेल्याच्या घरातून येत असल्याचे तिच्या लक्षात आले. या रागाच्या आळवणीमुळंच पाऊस पडतो आहे हे तिनं ओळखलं.

असाच एके दिवशी दिवसाढवळ्या विक्रमादित्यानं दीपक राग आळवायला सुरुवात केली. त्याबरोबर शहरातले सारे दिवे आपोआप पाजळले. राजकुमारीनं दासीला विचारलं, "दिवसा

ढवळ्या दिवे कशाला लावलेत हे ? टाक मालवून." त्याप्रमाणे दासी दिवे मालवू लागली. परंतु तिनं एक दिवा मालवला की तो पुन: पेटे. ते पाहून राजकुमारीला भारी आश्चर्य वाटलं. इतक्यात तिच्या कानांवर दीपक रागाचे सूर आले. या खेपेला मात्र ती स्वत:च तेल्याच्या घरी जाऊन, घाण्यावर बसून गाणाऱ्या थोटच्या विक्रमादित्याला दुरून पाहून आली.

दुसऱ्या दिवशी राजकन्येनं राजाला सांगितलं, "महाराज, मला आता लग्न करायचंय. आपल्या शहरातल्या एकूण एक पुरुषांनी माझ्या महालाच्या खालून जावं, अशी दवंडी आपण पिटवा." त्याप्रमाणं राजानं जाहीर हुकूम काढून दवंडी दिली. त्याप्रमाणं सगळे पुरुष राजकन्येच्या महालाजवळून चालत गेले. परंतु राजकन्येनं कुणालाच पसंत केलं नाही. ती राजाला म्हणाली, "महाराज, तुमच्या राज्यातले सारे पुरुष नाही आले. आता तुम्ही पुन: हुकूम काढा की ज्याच्या घरातला पुरुष येणार नाही, त्याला कडक शिक्षा करण्यात येईल." ही दवंडी ऐकताच तेलिणीला वाटलं. आपल्या नवऱ्याबरोबर या थोटचालाही पाठवायला पाहिजे. नाही तर नाहक शिक्षा व्हायची. म्हणून तिनं विक्रमादित्याला एका मोठ्या हाऱ्यात घातलं. अन् तो हारा डोकीवर घेऊन ती राजकन्येच्या महालाखालून निघाली. इतक्यात सज्ज्यात उभ्या असलेल्या राजकन्येनं चटकन आपल्या हातातली फुलांची माळ विक्रमादित्याच्या गळ्यात टाकली.

चोरीच्या गुन्ह्याबद्दल आपण ज्याचे हातपाय तोडून टाकण्याची शिक्षा दिली होती अशा लुळ्यापांगळ्या माणसाला आपल्या मुलीनं नवरा म्हणून निवडावं, याचा राजाला भयंकर राग आला. त्यानं तिची चांगली खरडपट्टी काढली. परंतु ती आपला हट्ट सोडायला तयार होईना. अखेर राजानं तिला धमकी दिली की, "जर तू या थोटच्याशी लग्न केलंस तर तुला मी एक फुटकी कवडीही

देणार नाही." राजकन्या बाणेदार होती. ती म्हणाली, "काही हरकत नाही. माझ्या जे नशिबात असेल ते तर तुम्ही हिरावून घेऊ शकणार नाही."

त्या थोटच्याला घेऊन राजकुमारी गावाबाहेर एका तळ्याच्या काठी राहू लागली. तिनं आपल्या कानातल्या हिऱ्याच्या कुड्या काढून तेलिणीकडे दिल्या आणि त्या विकून पोटापाण्याला लागणाऱ्या वस्तू, काही रेशीम, कापड आणि कवड्या आणायला सांगितल्या. भरतकामात ती अत्यंत प्रवीण होती. तिनं रेशमानं दोन रुमाल भरले आणि ते तेलिणीला देऊन बाजारात विकून यायला सांगितले. एकेका रुमालाचे शंभर-शंभर रुपये आले. अशा प्रकारे भरलेले रुमाल विकून तिनं दोन-तीन हजार रुपये जमवले. याच वेळी गुराख्यांच्या मुलांना तिनं दोन-दोन चार-चार कवड्या देऊन त्यांच्याकडून घर बांधायला उपयोगी पडतील असे दगड गोळा करविले. मग तिनं एक टुमदार घर बांधून घेतलं आणि ती दोघं त्या घरात आनंदानं राहू लागली.

एके दिवशी राजाकडे चार मंडळी आली. त्यांना राजाकडून न्याय करवून घ्यायचा होता. त्यांच्यापैकी एक लक्ष्मी होती. दुसरा धर्म होता. तिसरा कर्म होता आणि चौथी अक्काबाई होती. ते सर्वजण म्हणाले, "आमच्यापैकी श्रेष्ठ कोण ते तुम्ही सांगा." राजा चांगलाच अडचणीत सापडला. कुणाला श्रेष्ठ ठरवावं ते त्याला कळेना. त्या काळी असा नियम होता की राजानं समोर आलेल्या प्रश्नाचा निवाडा दिल्याखेरीज अन्नपाणी घ्यायचं नाही. राजाला निर्णय देता येईना. दोन दिवस झाले. त्याच्या पोटात अन्नाचा कण किंवा पाण्याचा थेंब गेला नाही. हा निवाडा करण्याच्या कामी आपल्याला मदत करण्यासाठी राजानं आपल्या जावयांना आणि इतर नातेवाइकांना बोलावून घेतलं. परंतु कुणालाच त्या प्रश्नाचं उत्तर सुचेना. राजकुमारीच्या कानांवर ही सारी हकिगत गेली तेव्हा तिनं तेलिणीकडून आपल्या आईला निरोप

पाठवला की, " बाबांनी त्यांच्या इतर जावयांना बोलावून घेतलंय, तसं माझ्या यजमानांनाही त्यांनी बोलावून घ्यावं. कदाचित ते या प्रश्नाचं उत्तर बरोबर देऊ शकतील."

राणीनं राजकन्येचा निरोप राजाला सांगितला. राजा अगदी टेकीला आला होता. त्याला वाटलं, पाहू तरी हा थोटा जावयी काय सांगतोय? म्हणून त्यानं विक्रमादित्याला घेऊन येण्यासाठी पालखी पाठवली. विक्रमादित्य आला. दरबारात त्याला गादीवर बसवण्यात आलं. तेव्हा त्यानं त्या चारी व्यक्तींना बोलावून विचारलं, "आता सांगा, तुम्हांला काय हवंय?" ते चौघेही म्हणाले, "आमच्या-पैकी श्रेष्ठ कोण याचा निर्णय आम्हांला हवाय."

विक्रमादित्य म्हणाला, "ठीक आहे, तुमच्यापैकी एकेकानं आळीपाळीने पुढं यावं आणि आपलं वैशिष्टय सांगावं."

त्याप्रमाणे प्रथम धर्म पुढं आला आणि आपल्या मोठेपणाचं वर्णन करू लागला. तो म्हणाला, " माझ्याच आधारावर हे जग टिकून आहे. मी आहे म्हणूनच राज्य चालतं." यावर विक्रमादित्य म्हणाला, " तू जर एवढा मोठा आहेस तर मग माझे हे कापलेले हातपाय पुन: पहिल्यासारखे करून दे पाहू ?" धर्म म्हणाला, " ते माझ्या शक्तीबाहेरचं काम आहे. मला ते जमायचं नाही."

विक्रमादित्य त्याला म्हणाला, "ठीक आहे. जा, जाग्यावर जाऊन बैस."

धर्मानंतर कर्म आलं. तेही खूप बढाया मारू लागलं. त्यालाही विक्रमादित्यानं तेच काम सांगितलं. पण तेही म्हणालं, "हातपाय जोडून देण्याचं काम मला जमायचं नाही." त्यालाही परत जाग्यावर बसायला सांगण्यात आलं.

त्याच्यानंतर लक्ष्मी आली. ती सांगू लागली. "मी नसेन तर माणसाला काही किंमत नाही. मी वाटेल ते करू शकते." परंतु

जेव्हा तिला हातपाय जोडून दाखवायला सांगितलं तेव्हा आपला पराभव कबूल करून ती जाग्यावर जाऊन बसली.

शेवटी आली अक्काबाई. विक्रमादित्यानं तिला सांगितलं, "तू जर एवढी मोठी आहेस तर माझे हातपाय मला परत मिळवून दे." योगायोगाची गोष्ट अशी की याच वेळी आठ वर्षांची मुदत पुरी झाली होती. म्हणून अक्काबाई म्हणाली, "हात्तिच्या त्यात काय मोठंसं? तुम्ही तुमचे थोटे हातपाय थोडा वेळ शालीखाली झाकून ठेवा अन् काय होतंय ते बघा." त्याप्रमाणे विक्रमादित्यानं आपले हातपाय अंगावरच्या शालीनं झाकून घेतले. थोड्या वेळानं त्यानं शाल काढली. त्याचे हातपाय पहिल्यासारखे झाले होते. यावर विक्रमादित्य म्हणाला, "या चौघांमध्ये अक्काबाईच सर्वश्रेष्ठ होय."

सर्व लोक आश्चर्यानं पाहात राहिले. तेव्हा अक्काबाईनं सर्वांना सांगितलं, "लोकहो, हा कुणी चोर नसून धर्मानं चालणारा राजा वीर विक्रमादित्य आहे. त्यानं दुसऱ्यावर उपकार करण्यासाठीच इतक्या यातना सहन केल्या."

हे ऐकताच राजाला पश्चात्ताप झाला आणि तो विक्रमादित्याची क्षमा मागू लागला. विक्रमादित्य म्हणाला, "राजा, यात तुझा काहीच दोष नाही. हा सारा दैवाचा खेळ होता."

त्यानंतर विक्रमादित्य आपल्या राणीला बरोबर घेऊन आपल्या राज्यात परत गेला आणि प्रजेला सुखात ठेवून राज्य करू लागला.

आमची गोष्ट संपली. रात्र खूप झाली.

राजाची प्रजा सुखी झाली. तसेच सुखी आपण होऊ या.



# सात चिडया

निवेदक :
प्रा. सदाशिव माळी



एकज गावम्हान सात बैनी ऱ्हात व्हत्यात. सर्वीसले चांगलं घरदार जोईसन देलं व्हतं. भाऊ मातर गरीव व्हता. तो एकदाव् बैनीसनी घर पाव्हना म्हनीसन ग्या. मोठी बहीननी घर भाऊ ग्या. बहीननी खुशाली इचारी. बहीन आनंद-म्हान व्हती. भाऊ दुसरी बैनना घर ग्या. तीबी मजाम्हान व्हती. भाऊ साती बहीनीसनी बाक ग्या. सर्वीसना संसार चांगला चाली ऱ्हायंता. सव्र्या भरेल घरन्या रान्या व्हत्यात.

दिनमावतले भाऊ धाकली बहीननी घर बसेल व्हता. भाऊ दूरथीन येल. थकी ग्या. त्याले खूप भूक लागनी व्हती. बहीन भाऊसे बोलत बठनी, पन जेवान काई इच्यारेना. तिले वाटन्, "भाऊ मोठी बहीननी घर पहिलेंग ग्या व्हई. तठे तिनी भाऊले जेवाई व्हई." भाऊ बसऽऽ. बसऽऽ. बसना. आनि कटाईसनी मोठी बहीननीबाक ग्या. मोठी बहीननीबी त्याले जेवान सांग न्हई. तिना मनम्हान ऊन, "धाकलीना भाऊवर जास्ती जीवसे. तिनी त्याले नक्की जेवाइ व्हई. आते आपुन कसाले इचारवा." बिचारा भाऊ भूकनीमारे गई ग्या. त्याले चालायेबीना.

भाऊले वाटन, दुसरी बहीननीबाक जावा. तो तिनघर ग्या. दुसरी बहीनले वाटन्, "भाऊ आजून कसा भुक्या न्हाई?" त्याले सात बैनी सेतीस. दुसरी कोनथीबी बहीननी त्याले जेवाइच व्हई." तिनीबी त्याले जेवाइ नही.

भाऊ बठ्ठ्या बहीनीसनी घर ग्या. पन एकनीबी त्याले खावाले दीघ् नही. भाऊ पडना गरीब. काय करी? रातभर त्याले जप उनी नही. आपुन दलिंदर म्हनीसनी आपुनले बहीनीसनी जेवाइ नही, आसे त्याले वाटन् . तो सकायलेज उठना. गाव जास म्हनीसनी सव्र्या बहीनीसना त्यानी निरोप लिधा. "एक दिन न्हाई जाय. पाव्हनचार खाई जाय." कोनथीज बैननी आसे भाऊले मनफाईन सांग न्हई.

भाऊले ऊना राग. आते बहीनीसना गावले कैनबी जावान नही, आसे त्यानी मनम्हान ठराव. भाऊ ऊना तशा हात हालाईसनी परत ग्या.

भाऊ जावावर साती बहिनी एकठिकाने जमन्यात. मोठीनी धाकलीले इचारे, "भाऊले तू कायकाय न्हांद व्हत व्" धाकलीले तिना बोलाना आचंबा वाटना. ती बोलनी, "तूच त्याले जेवाइ व्हई, आसे माले वाटन्. मी नही बैन त्याले जेवान सांग." मोठीनी

सर्वीसले इचार, "भाऊ कोनघर जेवना व् ?" बहीनी काय उत्तर दीथीन ? त्या सर्वीसनी खालते माना घाली लिध्यात.

भाऊ आपला गावले परत ग्या. बहीनीसनी मना अपिमान क्या. आपुन दलिदर. भाऊ संतापऽऽ संतापऽऽ संतापना. त्या संतापना भरम्हान त्याले ऊन मरन. मरानी एखत त्यानी बहीनीसले सराप दिधा. "तुम्हेन मरश्यात तव्हय चिडया व्हश्यात!"

भाऊनी देल सराप खरा ठरना. साती बहिनी मरावर चिडया व्हईग्यात. त्या जंगलम्हान टोई करीसनी एकजोडे ऱ्हाऊ लागन्यात. लोक जंगलम्हाईन येतस–जातस–आनि त्या साती चिडया जोर-जोरम्हान चिल्लातीस—

टोय.....टोय.....टोय.....

सात बहीनीसना एखलाज भाऊ.....

भुक्याच.....गया.....

टोय.....टोय.....टोय.....

---

चिडया = चिमण्या. एकज = एकाच. बैनी = बहिणी. सर्वीसले = सर्वांना. जोईसन = पाहून. देलंव्हतं = दिलं होतं. मातर = मात्र. पाव्हना = पाहुणा. म्हनीसन = म्हणून. इचारी = विचारली. तीबी = तीसुद्धा. बाक = कडे. भरेल = भरलेल्या. दिनमावतले = सायंकाळी. व्हती = होती. तठे = तिथे. जेवाइ व्हई = जेवायला सांगितले असेल. पहिलेंग = पहिल्यांदा. रान्या = राण्या.
कटाईसनी = कंटाळून. बी = ही, सुद्धा. त्याले = त्याला. सांग न्हई = सांगितले नाही. धाकली = लहान. जीव = प्रेम. तिनी = तिने. आते = आता. आपुन = आपण. इचारवा = विचारावे. भूकनीमारे = भुकेमुळे. गई ग्या = गळून गेला. तिनघर = तिच्याघरी. सेतीस = आहेत. कोनथीबी = कोणीही. बठ्ठया = सर्व. पन = पण. खावाले = भोजनाला. पडना = पडला. रात = रात्र. जप = झोप. दलिदर = दरिद्री. सकायलेज = पहाटेच. उठना = उठला. लिधा = घेतला. दिन = दिवस.
पाव्हनचार = पाहुणचार. कोनथीज = कोणत्याही. मनफाईन = मनापासून.

सांग न्हई = सांगितले नाही. ऊना = आला. कैनबी = कधीही. जावान् = जायचे. नही, न्हई = नाही. मनम्हान = मनात. हालाईसनी = हलवून. एकठिकाने = एकत्र. न्हांद व्हत = स्वंयपाक केला होता. व् = ग. आचंबा = आश्चर्य. आसे = असे. माले = मला. कोनघर = कुणाच्या घरी. जेवना = जेवला. दीथीन = देतील. मना = माझा. अपिमान = अपमान. भरम्हान = भरात.

ऊन = आले. मरन् = मरण. मरानी एखत = मरताना. त्यानी = त्याने. बहीनीसले = बहिणींना. सराप = शाप. दिधा = दिला. तुम्हेन = तुम्ही. मरइयात = मराल. तव्हय = तेव्हा. व्हइयात = व्हाल. देल = दिलेला. ठरना = ठरला. साती = सातही. मरावर = मेल्यानंतर. व्हईग्यात = झाल्या. जंगलम्हान = जंगलात. टोई = टोळी. करीसनी = करून. येतस = येतात. जातस = जातात. आनि = आणि. जोरजोरम्हान = जोरजोरात. चिल्लातीस = चिवचिवाट करतात. टोय = टोळ. बहीनीसना = बहिणींचा. एखलाज = एकटाच. भुक्या = उपाशी. ज् = च. एकजोडे = एकत्र.





# राजपुत्र नागनाथ

**निवेदिका : श्रीमती जानकीबाई पाटील**

असंच एक खेडेगाव होतं. तिथं गोपाळराव व रुक्मिणीबाई हे नवरा बायको राहात होते. गोपाळराव श्रीमत होते तसेच

हुशार पण होते. त्यांचा संसार आनंदात चालला होता. त्यांना फक्त एकच दु:ख होतं ते म्हणजे त्यांना मूलबाळ नव्हतं. त्यांनी पुष्कळ नवस सायास केले. पण त्यांचा काही उपयोग झाला नाही. म्हणून ते नाराज असायचे.

असेच दिवस चालले होते. तशातच एकदा त्यांनी आपल्या लग्नाचा वाढदिवस साजरा करण्याचे ठरविले. जवळच्या मित्रांना बोलाविले. सगळीकडे धामधूम चालली. इतक्यात साप साप अशा आरोळ्या आल्या. सगळीकडे एकच गडबड झाली. कोणाला काय करावे ते सुचेना. तो साप कोणाला दंश न करता सरळ माजघरात आला व त्या ठिकाणी देवाची एक मूर्ती होती तिथं वेटोळे करून बसला. गोपाळरावांनी घरात येऊन एक दुधाचा पेला घेतला व तो त्याचे पुढे ठेवला. साप त्यातील थोडे दूध प्यायला. इतक्यात गोपाळराव घरात गेले. त्यांनी आपल्या घरातील एक लाकडी पेटी आणली व ती त्या सापाच्या जवळ ठेवली. तो साप त्या पेटीत हळूच जाऊन बसला. नंतर रुक्मिणीने पेटीला कुलूप लावून ती पेटी आत नेऊन ठेवली.

प्रथम प्रथम रुक्मिणीबाईंना त्या सापाची फारच भीती वाटत होती. पण पुढे त्यांना त्या सापाचा इतका सराव झाला की, त्या स्वत: त्या सापाला दूध पाजू लागल्या. त्या ज्या वेळेस पूजेला बसत असत त्यावेळी तो साप त्यांच्या शेजारी येऊन बसत असे. त्याला माणसाचे बोलणे समजत नव्हते तरी सर्व खुणा समजत होत्या. पुढे पुढे रुक्मिणीबाई त्या सापाशी इतक्या समरस झाल्या की, त्यांना आपल्याला मूलबाळ नाही याचीसुद्धा अजिबात आठवण होत नसे! तो साप म्हणजे आपला मुलगाच आहे असे त्या मानीत असत. त्यामुळे गोपाळरावांनासुद्धा समाधान वाटत होते.

एके दिवशी रुक्मिणीबाई सापाला दूध पाजत होत्या. इतक्यात गोपाळराव बाहेरून तेथे आले. रुक्मिणीबाई त्यांना म्हणाल्या, "आपण या सापाचे लग्न करू या म्हणजे आपल्याला सून येईल."

गोपाळरावांना हे बोलणे पटले नाही. ते म्हणाले की, "या सापाला कोण मुलगी देणार"? त्यानंतर दोघेही काही बोलले नाहीत. दुसरे दिवशी रुक्मिणीने एक युक्ती शोधून काढली. जर एखाद्याचे लग्न ठरले व जर तो नवरा मुलगा हजर नसेल तर त्याच्या आवडीच्या गोष्टीशी लग्न लावले जाते या गोष्टीचा पडताळा घ्यावा म्हणाल्या. त्याप्रमाणे आपण या सापाशी त्या मुलीचे लग्न करू म्हणजे आपल्याला सून येईल असे त्यांनी ठरविले. गोपाळरावांना रुक्मिणीबाईचा विचार पटला. पण त्यांना एक मोठा प्रश्न पडला की, जर आता लग्न केले तर पुन्हा काहीं दिवसांनी मुलगा कोठून आणावयाचा ? पण रुक्मिणीबाईंनी त्यांची समजूत घातली.

काही दिवसांनी गोपाळराव मुलगी पाहण्यासाठी गेले. एका गावामध्ये वामनराव नावाचे त्यांचे मित्र रहात होते. त्यांचेकडे ते गेले. त्यांना आपण आपल्या मुलाचे लग्न करीत आहे असे सांगितले. व त्यासाठी एखादी चांगली मुलगी सुचवा असे म्हटले. गोपाळरावांचे हे शब्द ऐकून त्यांना फार आनंद झाला. त्यांनी आपल्या पहिल्या बायकोची मुलगी सावित्री ही लग्नाची आहे असे सांगितले. ती मुलगी जर आपण केली तर आपण दोघेही व्याही होऊ असे ते म्हणाले. गोपाळरावांनी मुलगी पाहून लग्न ठरविले व रुक्मिणीबाईच्या मनाप्रमाणे तिचे पेटीशी लग्न लावले.

गोपाळरावांच्या घरी आल्यापासून सावित्रीने त्यांच्या घराची सर्व माहिती करून घेतली. रुक्मिणीबाईंनीसुद्धा तिला खुशीत ठेवली होती. पण पुढे पुढे ती खिन्न दिसू लागली. म्हणून एकदा रुक्मिणीबाईंनी तिला तू अशी खिन्न का दिसतेस असे विचारले. तेव्हा सावित्री म्हणाली, "मला माझ्या नवऱ्याची आठवण येते. तो केव्हा परत येणार आहे ?" रुक्मिणीबाईंना तिची दया आली. त्यांनी तिला सांगितले, "आजच तुझा नवरा तुला भेटावयास येणार आहे. तेव्हा तू बाहेरची खोली स्वच्छ करून ठेव."

सावित्रीला फार आनंद झाला. ती दिवसभर मजेत होती. तिने बाहेरची खोली झाडून स्वच्छ केली व जेवावयास निरनिराळे पदार्थ केले. मग ती बाहेरच्या खोलीत झोपी गेली. त्या रात्री रुक्मिणीबाईंनी त्या पाळलेल्या सापास दाराच्या फटीतून आत सोडले व त्या झोपावयास निघून गेल्या. तो साप सळसळ करीत सावित्री झोपली होती त्या पलंगापाशी गेला. बराच वेळ प्रयत्न केल्यावर तो पलंगावर चढला. तो त्या गादीवरून व सावित्रीच्या अंगावरून फिरला. नंतर तिच्या बाजूला येऊन तो फणा काढून उभा राहिला. थोड्या वेळाने त्याने आपला फणा जोराने पलंगावर आपटला. त्याबरोबर त्या ठिकाणचा साप नाहीसा होऊन त्या ठिकाणी एक सुंदर राजकुमार निर्माण झाला. फणा आपटल्यामुळे झालेल्या आवाजासरशी सावित्री जागी झाली. पहाते तर खरोखरच त्या ठिकाणी आपले पतिराज असल्याचे तिला दिसले. तिने चटकन उठून त्यांना नमस्कार केला. नंतर तिने त्यांना जेवण व पाणी आणून दिले.

नंतर त्याने आपली सर्व हकिगत सावित्रीस सांगण्यास सुरुवात केली. तो म्हणाला, "मी सारंगपूरचा राजा विक्रमसिंग यांचा मुलगा आहे. मला शिकारीचा मोठा नाद होता. असाच एक दिवस शिकारीला गेलो असताना मला एक साधूमहाराज दिसले. त्यांच्याजवळ जाऊन त्यांची मी तपश्चर्या भंग केली. त्यामुळे त्यांनी मला 'तू साप होशील' असा शाप दिला. मी त्यांची फार फार विनवणी केली. पण त्यांना त्यांचा एकदा दिलेला शाप परत घेता येईना, म्हणून त्यांनी मला एक उःशाप दिला. म्हणाले की, ज्यावेळी तुझा तुझ्या बायकोशी संबंध येईल त्यावेळी तुला परत मानवाच्या शरीरात येता येईल. तेव्हापासून मी रानावनातून सापाच्या रूपाने भटकत आहे. याच घरात मला माझे खरे आई-वडील भेटले. सापाच्या रूपात असतानाच त्यांनी मला सांभाळले

व तुझ्याशी लग्न लावले. त्यामुळे मी आता माणसात आलो आहे."
सावित्रीला हे ऐकून मग खूप आनंद झाला.

दुसरे दिवशी रुक्मिणीबाई लवकर उठल्या व सावित्रीची खोलीबाहेर येण्याची वाट पाहू लागल्या. पण सावित्री काही बाहेर येईना. त्यांनी दार ठोठावले पण त्याचा काही उपयोग झाला नाही. रुक्मिणीबाई घाबरल्या. सापाने दंश केला तर सावित्री मरण्याची शक्यता होती. शेवटी दार ठोठावूनसुद्धा ती बाहेर येण्याचे चिन्ह दिसेना तेव्हा त्यांनी दार फोडण्याचे ठरविले. पण तेवढ्यात सावित्री जागी होऊन तिने दार उघडले. आत पाहातात तर खरोखरच एक मनुष्य झोपलेला. सावित्रीने गोपाळराव व रुक्मिणीबाई यांना सर्व हकिगत सांगितली. ते ऐकून त्यांना फारच आनंद झाला. त्यांनी मग त्याचे नाव नागनाथ असे ठेवले. त्या दोघांनीही गोपाळराव व रुक्मिणीबाई यांना नमस्कार केला. व तेथेच ते आनंदाने संसार करू लागले.

इकडे सावित्रीच्या सावत्र बहिणीचे--कमलचेही लग्न झाले होते. काही दिवस गेल्यानंतर सावित्रीला आपण गरोदर आहोत याची जाणीव होऊ लागली. गोपाळरावांनी ही वातमी सावित्रीच्या वडिलांना कळवली. वामनरावांना फार आनंद झाला. त्यांनी सावित्रीला भेटावयाचे ठरविले. जाताना त्यांनी सावित्रीच्या सावत्र आईकडून लाडू घेतले. त्या लाडवांमध्ये सावित्रीच्या सावत्र आईने वीष घातले होते. घरी आल्यावर त्यांनी लाडवाची पिशवी सावित्रीला दिली. पण सावित्रीला शंका आली. तिने त्यातील दोन लाडू कुत्र्यास खावयास दिले. ते कुत्रे तडफडून मेले. हे तिने नागनाथास दाखविले व ते सर्व लाडू उकिरड्यावर फेकून दिले.

इकडे वामनरावांनी बाळंतपणासाठी सावित्रीला नेणार असे सांगितले व गोपाळरावांनी तशी परवानगी दिली. गोपाळरावांनी तिला माहेरी पाठविली. नंतर काही दिवसांनी ती बाळंतीण झाली व तिला मुलगा झाला.

कमललाही बाळंतपणासाठी आणले होते. नंतर थोड्याच दिवसांत तीही बाळंत झाली. पण तिला मुलगी झाली. सावित्रीला मुलगा झाला व माझ्या मुलीला मुलगी झाली याबद्दलचे विचार सावित्रीच्या सावत्र आईच्या मनात घोळत होते. एके दिवशी सावित्री आपल्या मुलाला फळीवर बसून अंघोळ घालत होती. तिच्या सावत्र आईने ते बघून तिला त्या फळीखालच्या भुयारात ढकलून दिले. त्या भुयारात साती आसरा रहात होत्या. त्यांनी अलगत सावित्रीला व तिच्या मुलाला झेलले व जवळ ठेवून घेतले. तेथे त्यांना काही कमी पडू दिले नाही. सावित्रीही मग त्यांच्याजवळ आनंदात राहू लागली.

इकडे नागनाथ आपल्या बायकोला व मुलाला पाहून यावे म्हणून आपल्या सासुरवाडीला आला होता. वामनरावांनी आपल्या जावयाची चांगली व्यवस्था ठेवली होती. असाच नागनाथ दुपारच्या वेळी पलंगावर बसला होता. तेथे थोड्या वेळात एक कासार आला व तो घरात गेला. कमलला कांकणे भरण्यासाठी तो आला होता. ती मुलीला ठेवून कांकणे भरण्यासाठी गेली. त्या वेळेस ती मुलगी रडू लागली. तेव्हा कमल तिला म्हणाली, "कार्टे, आता तुला दूध पाजले. आता रडावयास काय झाले?" आता गप पड की!" कासाराला त्या मुलीची कीव आली पण काय करणार? त्याने कांकणे भरली व तो निघाला. जाताना त्याला एक भुयार दिसले. तेथील एका बाईने कांकणे भरावयाची आहेत असे सांगितले. बिचारा कासार तिच्याबरोबर त्या भुयारात गेला. तेव्हा त्या ठिकाणी एक सुंदर मुलगी आपल्या मुलाला दूध पाजताना त्याला दिसली. कासाराने तिला कांकणे भरावयास बोलाविले. तिने मुलाला ठेवले व कांकणे भरण्यासाठी येऊ लागली. पण मुलगा रडू लागला तेव्हा परत ती मुलाजवळ गेली व म्हणाली, "नाग-नाथाच्या मुला, चुडा लेते मला न् मग घेते तुला." म्हणून चुडा

भरण्यासाठी गेली. कासाराने तिला चांगली कांकणे भरली व तो भुयाराबाहेर आला.

बाहेर नागनाथ कासाराची वाट पाहात बसला होता. त्याने कासाराकडे आपल्या बायकोची विचारपूस केली. त्यामुळे कासाराने झालेली सर्व हकिगत सांगितली. शेवटी म्हणाला की, नागनाथाच्या मुला चुडा लेते मला न् मग घेते तुला असेही ती म्हणाली होती. ते ऐकून नागनाथ तेथून चटकन उठला व भुयारात गेला. तेथे सावित्री मुलाला खेळवत बसल्याचे त्याला दिसले. नागनाथाला पाहून सावित्रीला फार आनंद झाला व तिच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागले. तिने झालेली सर्व हकिगत नागनाथाला सांगितली व साती आसरांनी आपल्याला कसे सांभाळले तेही सांगितले. नंतर नागनाथ व सावित्री परत आपल्या गावी आले व सुखाने राहू लागले. त्यांनी मग सुखाने राज्य केले, तसे तुम्ही आम्ही पण करू या.





# चेंडूफळी

**निवेदिका : डॉ. सरोजिनी बाबर**

अंगावर हिऱ्यामाणकांचे दागिने ल्यालेला, कपाळावर रत्नजडित पिंपळपान घातलेला, भरजरी वस्त्र नेसलेला आणि आपल्या बासरीमुळं सगळ्या गोकुळाला वेड लावणारा कृष्णदेव त्या दिवशी गोकूळ सोडून बाहेर गेला होता. त्यामुळं सारं गोकूळ कसं शांत झालं होतं. गौळणींचे वाडे

विसावले होते. कृष्णाच्या बाळलीलांनी गजबजलेले रस्ते निजले होते. यशोदाबाई मंचकावरी झोपी गेली होती. राधागौळण घरकामात गुंतली होती. म्हणजे कृष्णदेवाच्या खोडीमुळं विस्कळीत होणारं जग त्यावेळी कोमेजलेल्यासारखंच दिसत होतं.

त्यावेळी कृष्णदेव गेला होता वेळूंच्या बनात. तिथं खेळत होता. चेंडूफळी. त्याच्या हाती चेंडू होता न्हाईबाईनं गुंफलेला. दयाबाईनं आपले दागिने मोडून आणलेला. सईबाईच्या रत्नामाणकांनी माखलेला न् कृष्णदेवानं आभाळातील चांदोबाकडून आणलेला असा.

तर गंमत काय झाली की, खेळता खेळता वेळूच्या जाळीत खुळखुळ झाली आणि कृष्णदेवाच्या हातून निसटलेला चेंडू एकदम राधागौळणीच्या घरी गेला, तशी राधागौळण हारखली. पण कृष्णदेव हिरमुसला. हे बरं झालं नाही म्हणाला. आपल्या वाड्यावर गेला. बापाला भेटला. म्हणाला कसा, "माझा चेंडू आणून द्या. राधागौळणीच्या घरात गेलाय." तशी कृष्णदेवाच्या बापाचं काळीज हाडबडलं. नंदमहाराज काळजीत पडले. मोठा घोळ पडला म्हणाले. कृष्णदेवाच्या जिवाला धोका आहे अशा काळजीनं ते काळवंडून गेले. तडकाफडकी त्यांनी गवळवाड्याचा रस्ता धरला. राधागौळणीच्या घरी ते आले. तर ती राधागौळण म्हणते कशी, "मला हाक घालीत तुम्ही हो कशाला आला मामूजी? ज्याचं त्येलाच धाडून द्यावा. मी त्येलाच चेंडूफळी देईन. तुमी जावा." त्यामुळं त्यांचा नाइलाज झाला.

आणिक सांगायचं म्हणजे, राधागौळणीनं कृष्णदेवाच्या सगळ्या नातलगांची हीच वाट लावली. कुणाचं म्हणून ऐकलंच नाही की चेंडूफळीही माघारी दिली नाहीं. म्हणताना मग स्वत: कृष्णदेव तिच्या घरी आला. "चेंडूफळी दे" म्हणाला.

तितक्यात काय गंमत झाली की, नेमकी त्याच वेळी राधा-गौळण यमुनेला गेली होती. नवलाखी हार तिथल्या मूळ डोंबावर

काढून ठेवून आंघोळ करीत होती. कृष्णदेवानं ते पाहिलं. तडक तिथं तो यमुनेवर गेला. त्यानं राधागौळणीची मधुपका चोळी, पिवळा पितांबर न् नवलाखी हार पळवून आणला. पण राधागौळणीला ते कळलंच नाही. माझी वस्त्रं कोणी नेली, माझा हार कोणी नेला, म्हणून डांगोरा पिटत ती उभ्या गोकुळात निघाली. सासू रागवेल म्हणाली. संतापली. ओरडली. घरच्या पेटलेल्या कातीव चुलींची न् उतरंडीच्या साळीडाळीचीदेखील त्या नादात तिनं फिकीर मानली नाही. तिनं प्रत्येकाला आपल्या वस्तू चोरीला गेल्याची बातमी दिली. पण कुठं म्हणून कुठंही कसलाच तलास लागेना.

होता होता मग काय झालं की, कृष्णदेवाचाच हा खेळ असला पाहिजे याबद्दल तिची खात्री पटली. म्हणून मग ती कृष्णदेवाकडे गेली. माझं अमकं अमकं दे म्हणाली. पण कृष्णदेव ऐकेना. चेंडूफळी अगोदर दे म्हणाला. तशी कोणीच माघार घेईना. कारण नवलाखी हार दिला नाही तर राधागौळण स्वतःला विसरणार होती न् चेंडूफळी दिली तर कृष्णदेव तिला विसरणार होता, म्हणून कोणीच माघार घेईना. म्हणताना मग राधागौळणीनं एक युक्ती काढली. हरएक प्रकारच्या दुकानदाराकडे गेली. गोण्या गोण्या माल भरून द्या म्हणजे कृष्णदेव भुलेल म्हणाली. पण दुकानदार नाही म्हणाले. कृष्णदेव आमची खोडी करील म्हणाले. त्या कारणानं राधागौळण घाबरली. कृष्णदेवाची विनवणी करीत बसली. नवलाखी हार दे नाही तर सासू न् नवरा रागावतील म्हणाली. पण काही केल्या हा ऐकेचना. तशी मग कृष्णदेवापुढं स्वतः आपणालाच विसरण्यापेक्षा सासूचा न् नवऱ्याचा राग परवडला म्हणाली. आणिक तिनं चेंडूफळीला सात पड्यात लपवली.

इकडे त्या गोष्टीचा परिणाम भलताच झाला. उभ्या गोकुळात निराशा पसरली. कृष्णदेव सर्वांनाच विसरून गेला, यशोदामाईनं तर अन्नपाणीदेखील वर्ज्य केलं. गौळीवाडे हिरमुसले. बालगोपाळ

रुसून बसले. गाईम्हशींनी अन्नपाणी टाकलं. वृक्षवेली कोमेजून गेल्या. नदीनाले शांत झाले. पशुपक्षी आकांत करू लागले. म्हणजे-गोकुळनगरीचा आनंदच पार मावळून गेला. "आता काय करावं?" ज्याला त्याला चिंता पडली.

आणि त्याच वेळी इकडे कृष्णदेव न् राधागौळण मजेत राहू लागली. दोघांनाही कशाचं भान उरलं नाही. कृष्णदेवानं राधा-गौळणीचा नवलाखी हार घातला. राधागौळण जगाला विसरली आणि तिनं चेंडूफळी लपवून ठेवली तर कृष्णदेवही जग विसरून गेला.

असेच मग कितीक दिवस आले आणि गेले. आणि मग एक दिवस यमुनेच्या काठी एक चमत्कार घडला.

सूर्याची कन्या राधिका तिथं आली. ती बत्तीस लक्षणी देवता होती. तिचं तेज सगळीकडे फाकलं. उभं गोकूळ तिथं मोठ्या आशेनं धावलं. गोकुळानं राधिकेला विचारलं, "देवी, आमचा कृष्णदेव कुठं भेटला का? आमचा जीव व्याकूळ झाला आहे. कृष्णदेवाविना गोकूळ खुळं झालं आहे. पाहिलात का त्याला कुठं?"

त्यावर राधिका हसली. म्हणाली कशी, "कृष्णदेव राधा गौळणीच्या घरी, इथंच तर आहे, मला काय विचारता लोकहो?"

त्यासरशी त्या लोकांच्यासमोर राधिकेनं राधागौळणीचा वाडा उभा केला. कृष्णदेव तिथं रासक्रीडा करीत होता. लोकांचे दर्शन घडताच त्यानं बाळरूप धारण केलं. वाड्याबाहेर रांगत आला. नवलाखी हार टाकून निघाला. तशी मग राधागौळणीला राधिकेनं मागणी केली, "कृष्णदेवाची चेंडूफळी आण."

राधागौळणीनं पाहिलं. सूर्यकन्या फारच तेजस्वी होती. तिच्यापुढं कुणाचा पाड चालणारा नव्हता. राधिकेनं घरात नजर टाकताक्षणीच सात पड्यात ठेवलेली चेंडूफळी आपोआप रस्त्यावर

आली. लोक हारखले. गोकूळ जसं काय जिवंत झालं. कृष्णदेव आपोआप घरी आला. यशोदामाईला आनंद झाला. गौळणी सुखावल्या. पानं-फुलं हसली. पशुपक्षी नाचले. वृक्षवेली पाणावल्या. नदीनाले उसळले. गाई-म्हशींनी हुंकार भरला. सगळीकडे आनंदी आनंद झाला.

आणि त्या नादात राधिकेशी झिम्मा खेळीत न् नाचत कृष्ण-देवानं पुन्हा चेंडूफळीचा डाव मांडला. त्यासरशी रस्त्यावर फुलांचा भडिमार झाला. रंगीबेरंगी सुवासिक पायघड्या आल्या. आणि मग ठरली रेघ न ओलांडता चेंडूफळी आनंदानं नाचू लागली. खेळ रंगत गेला. गोकूळ नगरीचा आनंद मग काय विचारावा? राया इंद्राचा दरबारदेखील ह्या सुखापुढं फिक्का पडला तर बाकी कशाबद्दल मग कुणी काही बोलायचंच काय कारण? नाही का?

